केशवचैतन्य जगन्नाथ कुंटे

गां. म. वि. मंडळाचें प्रकाशन

# गीत-बोधिनी

## भाग – १ ला

लेखक

पं. केशव गुंडो इंगळे

प्रि. माधव संगीत विद्यालय

पुणें, ५



प्रकाशक —

**बा. र. देवधर**

अध्यक्ष

गां. म. वि. मंडळ, मुंबई



मुद्रक —

**नि. वि. महाबळ**

गजानन मुद्रणालय, मिरज.

# प्रस्तावना

चिजांतील शब्दांना अर्थ असणें आणि चिजेंतील शब्द सुंदर आणि मधुर रीतीनें उच्चारतां येणें, हें गायकीचें महत्वाचें अंग आहे. परंतु या महत्वाच्या गोष्टीकडे गायक, – आणि विशेषत: महाराष्ट्रांतील गायक– फारसें लक्ष देत नाहींत, असा त्यांच्यावर आरोप आहे. या बाबतींत सर्वस्वी दोष त्यांनाच देतां येणार नाहीं. त्याचीं कारणें अशीं आहेत कीं, हिंदुस्थानी संगीतांतील बव्हंशी चिजा व्रजभाषेंत रचल्या गेल्या असून कांहीं मैथिली, राजस्थानी, पंजाबी या भाषेंतही रचल्या गेलेल्या आहेत. अर्थात् या सर्व भाषांचें ज्ञान गायकांस असत नाहीं. त्यामुळें त्यांच्या उच्चारामध्यें अशुद्धपणा राहून चिजेंतील मूळ शब्द बदलले जाऊन ओघानें सर्वच चिजेचा अर्थ दुर्बोध होतो. त्याचप्रमाणें बऱ्याचशा चिजांमधून संस्कृतप्रचुर शब्द असल्यानें व त्या चिजा गाणाऱ्या मुसलमान गवयांना हिंदु लोकांच्या कथा व त्यांतील व्यक्तींचीं नांवें परिचित नसल्यानें त्यांच्याकडूनही चिजांच्या शब्दांचा अपभ्रंश केला गेला आहे. तात्पर्य, कोणाच्या कां दोषामुळें असेना, पण बऱ्याचशा चिजांचा शब्दार्थ लागेनासा झाला आहे.

ही परिस्थिती गेलीं कित्येक वर्षें चालू आहे. परंतु आज शास्त्रीय संगीताकडे जनतेचें लक्ष अधिक प्रमाणांत लागत असून हिंदी भाषेचा प्रसार सार्वत्रिक होत आहे. शास्त्रीय संगीताचा श्रोतृवर्गही संगीत श्रवणाच्या बाबतींत चोखंदळ आणि चिकित्सक बनलेला आहे; आणि गायक निरर्थक चिजा कां गातात ? असा उघड उघड दोषारोप तो करूं लागला आहे.

ज्यांनीं पूर्वीच्या चिजा रचिल्या त्यांत कित्येक प्रतिभावान कवि होते. आणि त्यांनीं रचलेल्या चिजा निरर्थक मुळींच नव्हत्या. परंतु

मध्यंतरीच्या काळांत वरील परिस्थितीमुळें त्या अपभ्रंशित झाल्या आहेत आणि आज त्यांचें शुद्धीकरण होणें अगत्याचें झालेलें आहे. या गोष्टी–कडे लक्ष देऊन आमचे मित्र पं. केशवबुवा इंगळे यांनीं मध्यंतरी 'संगीत कला विहार' मासिकांत "ख्याल गायकीचीं विशिष्ट अंगें". ही अत्यंत उपयुक्त अशी लेखमाला लिहिली आणि त्या लेखमालेंतूनच प्रस्तुतच्या "गीतबोधिनी" पुस्तकाचा जन्म झाला.

प्रस्तुत पुस्तकांत पं. इंगळेबुवा यांनीं एकंदर ५६ रागांतील १२५ चिजा दुरुस्त करून त्या मराठी अर्थासह दिलेल्या आहेत. त्यामुळें गाय-कांना चिजांचा अर्थ आणि शब्दांचे योग्य उच्चार कळतील आणि त्यांच्या गायनांत रसपरिपोष करण्यासाठीं त्या गोष्टीचा उपयोग होईल अशी खात्री आहे. त्या दृष्टीनें या पुस्तकाच्या द्वारें त्यांनीं बहुमोल कार्य केलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

गांधर्व महाविद्यालय मंडळाचा, संगीतावरील उपयुक्त वाङ्मय प्रसिद्ध करणें हा एक प्रमुख उद्देश आहे आणि म्हणून हें पुस्तक मंडळा-तर्फे प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

शास्त्रीय संगीताचा गायक वर्ग, संगीत शिक्षक आणि विद्यार्थीवर्ग या पुस्तकाचा योग्य तो उपयोग करून शुद्ध चिजा गाण्याकडें अधिक लक्ष देईल, तर या पुस्तकाच्या प्रकाशनाचें चीज होईल. तसें होईल अशी मला पूर्ण आशा आहे.

शेवटीं या पुस्तकाचें मराठी रसिकही स्वागत करतील अशी अपेक्षा बाळगून मी माझे दोन शब्द पुरे करतो.

मुंबई
२३ नोव्हेंबर १९५४

**बा. र. देवधर**
अध्यक्ष,
गांधर्व महाविद्यालय मंडळ, मुंबई

# निवेदन

अभिजात रागदारी संगीतामध्यें चिजांतील काव्यार्थास फारसें महत्त्व नसलें तरी चिजेचे शब्द समजून त्यांचा अर्थ वा भावार्थ सम–जल्यास गाण्याची गोडी निश्चितपणें वाढेल यांत शंका नाहीं. बोलतानेंत तर शब्दांचे व उच्चारांचें महत्त्व फार असल्यानें चिजेचे शब्द व अर्थ समजल्यानें शब्दांची रचना योग्य प्रकारें होऊन बोलताना उठावदार, ढंगदार व मधुर होतील. तात्पर्य, गाण्याच्या रसपरिपोषास चिजेच्या अर्थानें खास मदत होईल. म्हणून त्या दृष्टीनें प्रस्तुत लेखकानें संशोध–नास सुरवात केली. सुदैवानें त्या वेळीं मी तुलसीदास रामायण वाचीत होतो व त्यामध्यें चिजांतील बरेच शब्द मला आढळून आले. नंतर सूरदास, मिराबाई वगैरे कवींचेंही काव्य मी थोडें फार त्या दृष्टीनें वाचलें. त्यांतही चिजांतील बरेच शब्द आढळले. या शब्दप्रयोगांच्या व हिंदी कोषाच्या आधारानें मी एक एक चीज पाहूं लागलो, तेव्हां मला त्यांचा भावार्थ समजूं लागला. त्यानंतर आपण केलेला प्रयत्न जनतेपुढें मांडावा या हेतूनें मी चिजांतील निरनिराळ्या विषयांच्या वर्ग-वारीनें संगीत कला विहारमध्यें 'ख्यालगायकीचीं विशिष्ट अंगें' या लेखमालेंत अर्थासह १३२ चिजा प्रसिद्ध केल्या. त्या वाचकांना आव–डल्या व हे लेख पुस्तक–रूपानें प्रसिद्ध करावे, अशा बऱ्याच सूचना रसिकांकडून आल्या. तसेंच या कामीं मुंबईच्या गांधर्व महा विद्यालय मंडळानें पुढाकार घेतल्यानें प्रस्तुतचें पुस्तक निघूं शकलें याबद्दल मला आनंद वाटतो.

या पुस्तकांत विषयवारीनें चिजांचे भाग पाडले असून शेंवटीं कठीण शब्दांचा अर्थही दिला आहे. त्यामुळें इतर चिजांचा अर्थ लाव–ण्याच्या दृष्टीनेंही त्याचा उपयोग होण्यासारखा आहे. हिंदी चिजांत इतर वाङ्मयाप्रमाणें शृंगाररसास प्राधान्य असलें तरी इतरही अनेक विषय चिजांमध्यें आहेत हें त्यांच्या अर्थावरून व वर्गवारीवरून सहज

ध्यानांत येईल. मासिकांत प्रसिद्ध झालेल्या लेखांत सुधारणा करून या पुस्तकांत ५६ रागांतील मिळून १२५ चिजा दिल्या आहेत. त्यांपैकीं भक्तिपर ७, उपदेशपर ७, मंगल प्रसंग ११, प्रासंगिक ४, वसंत ऋतु-वर्णन ११, रूप-गुण-वर्णन १७, मीलन १६, विरह २०, कृष्णलीला १४, होलिकोत्सव ५ व शास्त्रीय माहितीच्या ७ अशा चिजा आहेत. पुस्तकाच्या शेंवटीं राग व चिजांची सूची दिली आहे.

या पुस्तकांतील चिजांचा अर्थ लावण्याचें कामीं हिंदी व व्रज भाषेचे तज्ञ श्री. सज्जन राम केणी, ( हिंदी साहित्य रत्न, ) पुणें, व प्रा. अरविंद मंगरूळकर, पुणें, यांची मला बहुमोल मदत झाली आहे. इतकेंच नव्हे तर त्यांच्या मदतीवांचून मला हें पुस्तक चांगल्या प्रकारें काढतां आलें नसतें. म्हणून त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो. गां. म. वि. मंडळाचे अध्यक्ष प्रो. बी. आर. देवधर यांनीं मला केवळ शाब्दिक प्रोत्साहन दिलें नसून पुस्तक प्रसिद्ध करण्याची सर्व आर्थिक जबाबदारी मंडळाच्या वतीनें आपल्यावर घेतली याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

माझ्या प्रयत्नाचें चीज करणें रसिक वाचकांच्या हातीं आहे. आणि या पुस्तकाच्या बाबतींत त्यांनी विधायक सूचना केल्यास त्यांचा अवश्य विचार होईल. वाचकांकडून योग्य प्रोत्साहन मिळालें तर यापुढील भाग प्रसिद्ध करण्यास मला अधिक उमेद येईल. एवढें सांगून हें निवेदन संपवितों.

माधव संगीत विद्यालय,
पुणें ५
विजयादशमी शके १८७६
७ आक्टोंबर १९५४

**केशव गुंडो इंगळे.**

# गीत बोधिनी

## भाग १ ला

## विषय प्रवेश

ख्यालगायकीमध्यें परंपरेच्या चिजांचें फार महत्व आहे. पहिल्या प्रतीच्या गायकाजवळ अशा चिजांचा संग्रह असणें अत्यंत आवश्यक आहे. इतकेंच नव्हे, तर परंपरेच्या उत्तमोत्तम चिजा अवगत असल्याखेरीज पहिल्या प्रतीचा गवईच होऊं शकत नाहीं. कारण जुन्या चिजा ज्यांनी तयार केल्या ते स्वतः अत्यंत उच्च प्रतीचे तयार गायक असल्यामुळें संगीताच्या दृष्टीनें कोणत्या शब्दांची, वर्णांची योजना केली असतां संगीतक्षेत्रांतील करामतीस बाध येणार नाहीं, उलट जी पोषक होईल अशीच शब्द योजना करून त्यांनीं ख्याल बनविले असल्यामुळें ते आज शेंकडों वर्षें प्रचारांत राहिले आहेत. मराठी भाषेपेक्षां हिंदी भाषा मृदु, मधुर आहे हें कोणीही कबूल करीलच. तरीही हिंदीमधीलही जे शब्द गाण्याच्या दृष्टीनें कठोर वाटले त्या ठिकाणीं ते सुगम करण्याकरितां त्यास कांहीं प्रत्यय जोडून अवधि व व्रज भाषेचा उपयोग करून चिजांची भाषा शक्य तितकी मधुर व तान-बोलतानेस सुलभ केल्यामुळेंच हिंदी चिजांस मुलायमपणा आला आहे.

व्रज भाषेच्या माधुर्यासंबंधीं 'सूरपंचरत्न' या ग्रंथांत पुढीलप्रमाणें उल्लेख केलेला आहे. "हिंदी के अन्तर्गत गिनी जानेवाली भाषाओं में से जो लालित्य, जो माधुर्य, जो मनमोहकता व्रजभाषा में है वह और किसी भाषा में है ही नहीं। व्रज भाषा में काव्य के उपयोगी रमणीय शब्दों की भरमार है। कर्ण कटुता है ही नहीं।" गोस्वामी तुलसी-दासजींनी तर याहीपेक्षां कमालीची गोडी उत्पन्न करण्या करितां रामा-

यणामध्यें अवधि भाषेचा उपयोग केला आहे. चिजांतील शब्दांसंबंधीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत :-

(१) मूळ हिंदी शब्दास ऊ प्रत्यय जोडलेलें रूप. अशा प्रकारचीं रूपें तुलसीदासकृत रामायणामध्यें वापरलेलीं आहेत. उदाहरणार्थ :-

गाँव गाँव अस होइ अनन्दू । देखि भानुकुल कैरवचन्दू ॥ १ ॥

( तु. रा. अ. कांड पृ. ४५३ )

| मूळ शब्द | चिजेंतील रूप | मूळ शब्द | चिजेंतील रूप |
|---|---|---|---|
| बालम | बालमू | मीत | मीतू |
| घर | घरू | देस | देसू |
| कंत | कंतू | गहन | गहनू |
| कंथ | कंथू | पास | पासू |
| आन | आनू | टोना | टोनू |

(२) मूळ शब्दापुढें वा प्रत्यय जोडलेलें रूप :-

अशा प्रकारचा प्रयोग सूरदासांच्या पद्यांत आढळतो. उदा० :-

ऐसो कब करि हो मन मेरी ।
कर करुवा हरवा गुंजन को, कुंजन माहि बसेरी ॥

( सरस साहित्य, पृ. ४१ )

| मूळ शब्द | चिजेंतील रूप | मूळ शब्द | चिजेंतील रूप |
|---|---|---|---|
| गजरा | गजरवा | फूल | फुलवा |
| संग | संगवा | हार | हरवा |
| अनंग | अनंगवा | पियारा | पियरवा |
| बिदेश | बिदेसवा | साजन | सजनवा |
| छिन | छिनवा | लंगर | लंगरवा |
| हाट | हाटवा | संदेश | संदेसवा |
| पात | पातवा | दादुर | दादुरवा |
| लोग | लोगवा | परदेस | परदेसवा |
| बंधन | बंधनवा | पथिक | पथिकवा |



(३) 'ऊवा' प्रत्यय जोडून वापरलेलीं रूपें :- असा प्रयोग कवि सूरदासांच्या पद्यांत आढळतो.

उदा० :- ऐसो कब कहि हो मन मेरो ।
कर करुवा हरवा गुंजन को कुंजन माहिं बसेरो ।

(स. सा. पृ. ४१)

| मूळ शब्द | चिजेंतील रूप | मूळ शब्द | चिजेंतील रूप |
|---|---|---|---|
| गर | गरुवा | कंगन | कंगनुवा |
| घर | घरुवा | दर | दरुवा |
| सजन | सजनुवा | अंब | अंबुवा |
| लंगर | लंगरुवा | हार | हरुवा |

(४) 'रा' प्रत्यय जोडून वापरलेलीं रूपें. अशा प्रकारचें रूप सूरदासांचें पद्यांत आढळतें.

उदा० :- आज श्री गोकुल में बजत बधावरारी ।

(स. सा. पृ. ५३)

| मूळ शब्द | चिजेंतील रूप | मूळ शब्द | चिजेंतील रूप |
|---|---|---|---|
| पपीहा | पपिहरा | बधावा | बधावरा |
| मंजिल | मंजिलरा | | |

(५) 'या' प्रत्यय जोडलेलीं रूपें. सरस साहित्य–पद्यसंग्रहांत' अशीं रूपें आढळत.

उदा० :- पवन लगि डोलत बनकी पतियाँ ।
मानहुँ पथिकन बिकट बुलव हि काह न प्रेम की बतियाँ ।
अलक हिलत फहरत तन सारा होत है सीतल छतियाँ ।
यह छबि लखि ऐसी जिय आवत इतहि बितैये रतियाँ ॥

(स. सा. पृ. १०६)

| मूळ शब्द | चिजेंतील रूप | मूळ शब्द | चिजेंतील रूप |
|---|---|---|---|
| नींद | निंदिया | रात | रतिया |
| बात | बतियां | पाती | पतिया |
| छाती | छतियां | | |


Dr. Ashok Da. Ranade Archives

वरीलप्रमाणें अनेक उदाहरणें ग्रंथाधारासह देतां येतील. याखेरीज बेलचे – बेलरिया, आम – आमरिया, डाल – डालरिया, चमेली–चमेलरिया, घूंगर – घुंगरिया, फाग – फागरिया अशीं रूपें बनविलीं आहेत. कांहीं ठिकाणीं ड चा र होतो. जसे :– लडाई–लराई, चौलडा–चौलरा सुघड–सुघर, पडत–परत, पडी–परी, पकड–पकर, पडेहू–परेहू कांहीं ठिकाणीं जोडाक्षरें भाषाशास्त्राच्या नियमानुसार विभक्त केलेलीं दिसतात. उदा० :– उग्र–उगर, निर्मोही–निरमोही, मग्न–मगन.

व्रज भाषेपेक्षांही चिजांतील शब्द जास्त मोहक असावेत म्हणूनच कीं काय, क्रियापदापुढें ला, ली, लो, री, वा, अशा प्रकारचे प्रत्यय जोडलेले आढळतात. उदा० :– भइला, भयेला, लागीला, आइला, आयेला, भइली, गइली, भइलवा, गइलवा, आइलो, करीलो, राखीलो, बाजैलो, भरीलो, गइलो, लावोरी, आवेरी, खेलोरी, देवोरी, सुनरी, उडरी, छुवोरी, वगैरे. याखेरीज व्रज व अवधि भाषेंतील जबलग, तबलग, जबते, तबते, ढिगते, नामापुढें ओ उदा० :– नामो, मनभायो, बचावो, उदारो, मैसन, पियासन, हमसन, मोपे, पियापे, येरी, माई, री, माईरी, हारे, वगैरे शब्दप्रयोग निःसंशय कर्णमधुर असून, हिंदी चिजांमध्यें त्यांचा भरपूर उपयोग केलेला आढळून येतो.

तात्पर्य, अत्यंत सूक्ष्म विचार करून या चिजा बनविल्या गेल्या असल्यामुळें त्यांस अतुलनीय सौंदर्य प्राप्त झालें असून त्या दीर्घायुषी झाल्या आहेत.

आतां हिंदी चिजांच्या काव्यामध्यें कोणकोणते विषय आहेत यासंबंधीं विचार करूं.

१

# भक्तिपर चिजा

## १ भीमपलास–विलंबित एकताल

अब तो बड़ी बेर भई टेरत हूँ तुमको मेरे साईयाँ ॥ ध्रु. ॥

भँवरजालमें आन फँसे भवसागरते पार करो मेरे साईयाँ ॥१॥



अर्थ :– माझ्या परमेश्वरा, मी तुला आतां फार वेळ आळवीत आहे. संसारजाळचांत मी येऊन अडकून पडलों आहे. या भवसमुद्रांतून मला पार कर.

## २ राग–ललत–तिलवाडा

अरे मन राम नाम तू जप जप रे ॥ ध्रु. ॥

और तो साधन नहीं या जगमें योग याग जप तप रे ॥१॥

अर्थ :– हे मना तूं रामनामाचें भजन कर. ( जन्माचें सार्थक करण्यास ) या जगांत दुसरें कोणतेंही ( योग, याग, जप, तप ) हें साधन नाहीं.

## ३ ललत–वि. एकताल

अरे मन तू भज रे भज रे साहब को नाम ॥ ध्रु. ॥

जा कारन तोहे विधाताने रचो है सो तू नाहीं करत काम ॥१॥

अर्थ :– हे मना, तूं परमेश्वराचें भजन कर. ब्रह्मदेवानें तुला ज्याकरितां उत्पन्न केलें, तें काम ( परमेश्वराला जाणणें ) तूं करीत नाहींस.

## ४ तोडी–वि. एकताल

गोविंदको भजन कर ले रे मनरंग अपनो हित चित आठो जामे ॥ ध्रु. ॥

अंतर्यामें और नारायण पूरन होवे सब तेरे काम ॥१॥

अर्थ :– हे मनरंगा ( मनरंग–कवीचें नांव ), किंवा मना, गोविंदाचें भजन कर. ( त्यांतच ) अष्टौप्रहर आपलें हित पहा. शिवाय तुझ्या अंतर्यामीं नारायण असल्यावर तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील.

## ५ छायानाट–वि. एकताल

सुग्रीव राम कृपा चाहत दयाधन दयानिधान ॥ ध्रु. ॥

जो बल देत हनुमत सो कीजियें मोपे कृपा ॥१॥

अर्थ :– दयाधन, दयानिधि रामाच्या कृपेची सुग्रीव इच्छा करीत आहे. ज्या तुझ्या कृपेनें हनुमानास बल दिलें ती कृपा माझ्यावर कर.

## ६ तोडी–त्रिताल

सांच सांच कीजे अत सुख लीजे हरिभजनको मनुख जनम यह वृथा जायगो ॥ ध्रु. ॥

कहे गुलाब सुन रे मन मूरख लोभी चेता चेत न बूझे विखको त्याग श्रीमाधव नाम सुधारस पीजे ॥१॥

**अर्थ** :– हे मना, हा मनुष्यजन्म व्यर्थ चालला आहे; तूं हरिभजनाचें परम सुख घेऊन तो खरा कर. ( जन्माचें सार्थक कर ). गुलाब कवि ( महादजी शिंदे ) म्हणतात, अरे, मन मूर्ख आहे; अंतःकरण लोभी आहे; व चित्त मूढ आहे; तेव्हां ( विषयरूपी ) विषाचा त्याग करून माधव नामामृताचें पान कर.

संत गुलाब महाराज

## ७ पूर्वी–त्रिताल

हरि ये मेंको सब सुख दीनो, दूध पूत और अन धन लछमी केर पायो गोविंद रंग भीनो ॥ ध्रु. ॥

अगम अगोचर जग विस्तारन कृपा करन दुख हरन सुख करन सब बातनमो लायक कीनो ॥१॥

**अर्थ** :– परमेश्वरानें मला संपत्ति, संतति, धान्य, धन, लक्ष्मी वगैरे सर्व प्रकारचें सुख दिलें आहे. मी ईश्वर (गोविंद) भक्तींत रंगून गेलों आहे. अगम्य, अगोचर, जगाचा विस्तार करणारा, कृपाळू, दुःखहर्ता व सुखकर्ता असा जो ईश्वर त्यानें मला सर्व प्रकारची लायकी दिली आहे.

२

# उपदेशपर चिजा

## १ शंकरा–वि. एकताल

अरे नर देहीसो प्रीत न कीजिये, भाई सबही गर जान दिल लावो ॥ ध्रु. ॥

पीत करे कछु सरे नही जान फिर पैछो पछतान दिल लावो ॥१॥



**अर्थ** :– हे मानवा मनुष्यमात्रावर ( देहरूपी सौंदर्यावर ) प्रेम करूं नकोस. हें बांधवा, सर्व कांहीं विष मान. ( परमेश्वराकडे ) चित्त लाव. ( अशा प्रकारचें ) प्रेम करून कांहीं साधणार नाहीं. असें समज. मागाहून पश्चात्ताप करण्याची पाळी येईल; तेव्हां ईश्वराकडे चित्त लाव.

## २ राग शंकरा–त्रिताल

अनहत आद नादको भेद न पायो, पचि हारी गुनी ग्यानी ॥ ध्रु. ॥

बलहारी उन गुरुनकी है जिन मैंको ये भेद दिखाये ॥१॥

**अर्थ** :– अनाहत अशा आद्य नादाचें रहस्य कोणासही कळलें नाही. गुणी व ज्ञानी ( लोक ) प्रयत्न करून हरले. ( थकले ) अशा नादाचें रहस्य मला ज्यानें दाखवून दिलें तो गुरु धन्य होय.

## ३ राग बिहाग-वि. एकताल

जगजीवन थोरा थोरा रे समझ समझ देख ले ॥ ध्रु. ॥

सीख मान ले सदारंगकी बहुत गई अब तो जोगी भेख ले ॥१॥

**अर्थ** :– परमात्म्याचें खरें स्वरूप हळू हळू समजून घे. ( अथवा, या जगांतील जीवन फार थोडें आहे, म्हणून विचार कर ). सदारंगाचा ( कवि ) उपदेश ऐक. आतां पुष्कळ झालें ( आयुष्य व्यर्थ गेलें ). अजून तरी वैराग्य धारण कर.

## ४ राग बिहाग–त्रिताल

हमरी मडैया कैसी सूनी रामनामको बासा, जोगी जंगम जती सेवडा ॥ ध्रु. ॥

आसा तृष्णा मारके सब जा बैठे मठियामें साच गुरुका बचन सुनावे जो जाने सो सेवडा ॥१॥

अर्थ :- रामनामाचें निवासस्थान असलेली आमची शरीर रूपी झोंपडी शून्य कशी म्हणतां येईल ? योगी, जंगम, यती, जैनसाधु ( वगैरे सर्व ) आशेचें व तृष्णेचें दमन करून झोंपडींत जाऊन बसले. तरीसुद्धां खऱ्या गुरूचें वचन जो जाणतो व प्रचीतीस आणून देतो तोच खरा साधु होय.

### ५ राग श्री–तिलवाडा

गजरवा बाजोई बाजो बाजो रे ॥ ध्रु. ॥
धरि पल छिन माई यों बीतत हूं, आष्टो जामे काम किये सूना भईला ॥१॥

अर्थ :- सारखा गजर वाजत आहे. माई, घटका, पळ व क्षण अशा प्रकारें जात आहेत. आठहि प्रहर विषयवासना केली ती निष्फळ झाली.

### ६ राग हेम कल्याण–त्रिताल

अरे मन मान मान मूरख ग्यान ॥ ध्रु. ॥
प्रेम नगरिया अतही भारी मान विनोद कर ग्यान ॥१॥

अर्थ :- हे मूर्ख मना, ज्ञानाकडे लक्ष दे. ही प्रेम नगरी ( वैषयिक ) अत्यंत कठीण आहे, तो तमाशा आहे असें मानून ज्ञानाची कास धर.

### ७ राग नायकी कानडा-त्रिताल

गहेरी गहेरी नदिया बहुत है पवन चलत पुरवैया मोरी दैया ॥ ध्रु. ॥
गहेरी नदियन डरवन लागे, किस बिध उतरौंगी पार मोरी दैया ॥१॥

अर्थ :- हे दैवा, खोल खोल नदी वाहात असून पूर्वेकडचा वारा वाहात आहे. या अथांग नदीची मला भीति वाटत आहे. आतां या नदीच्या पार मी कशी उतरून जाऊं ?



३

## मंगल प्रसंगाच्या चिजा

### १ राग देवगिरी बिलावल (ताल तिलवाडा)

बना ब्याहन आया नीके बनीके कारन सीस सेहेरा झुलाया ॥ ध्रु. ॥
धन घरी धन रात सुहाग कीनो बनरी बना आये नैननमे कजरा घुलाया ॥१॥

अर्थ:- विवाहासाठीं वर आला. सुंदर दिसण्यासाठीं त्याच्या डोक्यावर तुरा डोलत आहे. वधूवर आले आहेत. त्यांनीं सुहागरात व हा क्षण धन्य केला आहे. डोळ्यांत काजळ घातलें आहे.

### २ राग नायकी कानडा (तिलवाडा)

बनरा मोरा प्यारा ब्याहन आया छैल छबीला लाडिला रंगीला ॥ ध्रु. ॥
भूखन हार चमेली बेला कंगना हाथ सजीला ॥१॥

अर्थ:- माझा लाडका, सुंदर, रंगेल ( आनंदी ) प्रियकर विवाहासाठीं आला आहे. त्याच्या गळ्यांत रत्नांचा (चमेली-बेलीयांचा) हार असून हातांत कंकण शोभत आहे.

### ३ राग पूरिया (वि. अेकताल)

फूलनको हारवा गूंध लावो री मालनिया डारू बनेंके गरे ॥ ध्रु. ॥
मोर मुगुट सीस सेहेरा बिराजे बनरीके गजरे मखतूल ॥१॥

अर्थ:- हे माळणी, फुलाचा हार गुंफून आण. वराच्या गळ्यांत तो घालीन. त्याच्या मस्तकावर मोरपिसांचा मुकुट व तुरा शोभत आहेत व नवरीचा गजरा काळ्या रेशमांत शोभत आहे.

### ४ राग हमीर (ताल झुमरा)

चमेली फूली चंपा गुलाब गूंध लावो री मालनिया हारवा लावो शौकी गरेवा डार डार ॥ ध्रु. ॥

हिरा मोतियनको सेहेरा बिराजे और सोवे सुवासा ॥१॥

**अर्थः**– रसिकाच्या (वराच्या) गळचांत घालण्याकरितां हे माळणी, चमेली चाफा, गुलाब इत्यादि फुलांचा हार गुंफून आण. हिरेमोत्यांचा तुरा शोभत आहेच. त्याचबरोबर सुंदर वस्त्रें शोभतात.

## ५ राग तोडी (ताल तिलवाडा)

येरी माई आज बधावरा सजनुवा घर आनंद जतन कर बाजेला मोरे मौंदिलरा सो ॥ ध्रु. ॥

सुधर मालनिया बिन बिन लाई, चतुर मालनिया गूंध गूंध लाई बेला चमेलीके हारवा सो ॥१॥

**अर्थः**– हे सख्यांनो, माझ्या प्रियकराच्या घरीं मंगल उत्सव असून 'मंदर' वाद्यें वाजत आहेत. आनंदीआनंद करा. चतुर अशा माळणीनी बेलिया चमेलीचे सुंदर हार गुंफून आणले आहेत.

## ६ राग देव गंधार (ताल त्रिताल)

लाडली बना बन आया सो मोरे धरु नीकी समधन समधि मिल बैठे सुभ घरी सुभ दिन ॥ ध्रु. ॥

गावो बजावो सब मिल सखिया सहेलरी रिझ बनरीको छिन छिन ॥१॥

**अर्थः**– हे प्रिय सखी, या शुभ मुहूर्तावर शुभ दिनी नवरा नटून थटून माझ्या घरीं आला असून व्याहि विहिण येऊन बसले आहेत. हे सख्यानो, तुम्ही सर्वजण गाऊन (वाद्यें) वाजवून नवरीचें क्षणाक्षणाला मनोरंजन करा.

## ७ राग बिहाग (वि. एकताल)

हो माई आजको दिन मोहे नीको लागत केसरको लो ॥ ध्रु. ॥

मुख तंबूल बीरी नाकको लग बेसर माथे तिलक दिया केसरको लो ॥१॥



**अर्थः**–हे माई, आजचा दिवस मला चांगला ( धन्य ) वाटत आहे. कुंकुमतिलक लावून घ्या. वधूच्या मुखांत तांबूल, नाकांत चमकी व कपाळास कुंकुमतिलक लावला आहे.

## ८ राग दरबारी कानडा (वि. एकताल)

दुलहन तेरी आछी लगीरी है छबकी झलना सलोनी रंगभीनी ये बनरी ॥ ध्रु. ॥

सोनेसां मुख देखो रिझाय लीनो, मोमदसा जब आवे सदारंग दर मिलना सलोनी रंगभीनी ये बनरी ॥१॥

**अर्थः**– हे सुंदर वधू, तुझ्या सौदर्याची चमक अत्यंत आकर्षक झाली आहे. ज्या वेळीं आनंदी व प्रेमळ ( सदारंग मोमदसा ) पति तिला मिळण्याकरितां या ठिकाणीं येईल तेव्हां तिचे सोन्यासारखें तेजस्वी मुख पाहून सर्वांनांच समाधान होईल. ( सर्वजण समाधान करून घ्या. )

## ९ राग बिभास (विलबित एकताल)

मालन आई बगुवामें चुनत गुलाब, मोतियन बेल चमेली ॥ ध्रु. ॥

ले जावत बनरा घर हार गूंध सेरा बनरी गूहत बेनी ॥१॥

**अर्थः**– माळीण बागेंत आली व तिने गुलाब मोतिया, बेलिया व चमेलीचीं फुलें गोळा केली. वरासाठीं हार गुंफून, तुरा बनवून व वधूसाठीं वेणी तयार करून वराच्या घरीं जात आहे.

## १० राग–शुद्धकल्याण (झुमरा)

सखि आज मौंदर बाजें बाजिरे झनुवा आज, की मुबारक बादिया ॥ ध्रु. ॥

सुभ घरी सुभ दिन नीकी मुहूरत आनंद भयो मोरे घर काजें ॥१॥

**अर्थः**– हे सखि, आज 'मंदर' ( एक वाद्य ) झन झन वाजत असून (सर्वांनी) शुभाशीर्वाद दिला आहे. माझ्या घरीं सुमुहूर्तावर (शुभ घडी,

शुभ दिन, शुभ मूहूर्त) मंगलकार्य असून आनंदीआनंद होऊन राहिला आहे.

### ११ राग दरबारी कानडा (विलंबित एकताल)

सुहागन चोलेरा चोलेरा पहरे सुवे रंग सोहागन चोलेरा अरे येरीसो ॥ ध्रु. ॥
साथ सखी मिल देहो मुबारको चोलेरा पहरे सुवे रंग सुहागन चोलेरा अरे येरी सो ॥१॥

अर्थः– (वर) 'सुहाग' (लग्नाच्या वेळचें वरानें नेसण्याचें) वस्त्र नेसला आहे. त्याचा रंगहि शोभत आहे. हे सर्व जमलेल्या सख्यानो त्याला आशीर्वाद द्या. अभिनंदन करा.

४

## प्रासंगिक चिजा

### १ राग भूप (तिलवाडा)

जबही सब निरपत निरास भये ॥ ध्रु. ॥
गुरुपद कमल वंदे रघुपत तब चाप समीप गये ॥१॥

अर्थः– जेव्हां सर्व नृपति (निरापत) निराश झाले तेव्हां रघुपतीनें गुरुचरणांस वंदन करून तो धनुष्याजवळ गेला. (ही चीज सीता–स्वयंवराच्या प्रसंगवर्णनाची आहे)

### २ राग मालकंस (वि. एकताल)

कबहूँ कपी रघु आवेंगे ॥ ध्रु. ॥
मेरे नैन चकोर प्रीति बसे राका शशि मुख ते न आवेंगे ॥१॥

अर्थः– हे वानरा, (मारुते) राम केव्हां येईल? माझ्या नेत्ररूपी चकोरांचें रामचंद्र रूपी पूर्णचंद्रावर प्रेम आहे. ते येणार नाहींत काय?



(मारुतीने सीतेची अशोक वनांत गांठ घेतली तेव्हां सीता मारुतीस विचारते आहे तो प्रसंग)

### ३ राग भैरव (झपताल)

धन जसोमत, राज नंद मेहरधर जिनके जनमसे री कृष्ण कुवर धन ॥ ध्रु. ॥
ब्रिज आनंद फूली सब फल पात मंगल गावो री सखी आज धन ॥१॥

अर्थः– यशोदा धन्य आहे. आणि बालकृष्णाचा जन्म झाल्यानें आज नंद राजाचें घर धन्य आहे. सर्व ब्रिजवासियांना आनंद झाला असून पानें व फूलें सुध्दां फुलली आहेत. सख्यानों मंगल गाणीं गा.

### ४ राग कोमल रिषभ आसावरी (त्रिताल)

बढैया लावो लावो रे लावो लावो रे आज सुघड घड पालना ॥ ध्रु. ॥
रतनजटित सुजटित हिंडोलना झूलावत जसोमत ललना ॥१॥

अर्थः– हे सुतारा, सुन्दर घडविलेला असा पाळणा घेऊन ये म्हणजे त्या रत्नजडीत व सुन्दर जडविलेल्या पाळण्याला यशोदा ललना झोंका देईल.

५

## वसंत ऋतुवर्णनाच्या चिजा

### १ राग–गौड मल्हार ताल–त्रिताल

कोयलिया बोलन लागी रे फूल रही फुलबारी पिया प्यारे ॥ ध्रु. ॥
आये ऋतमें बसंत बहारी टेसू फूले अंबुवा बौरे भ्रमर करत गुंजारे ॥१॥

अर्थ :– हे प्रियकरा, वसंत ऋतुला बहार आला असल्यानें बाग फुलली असून कोकिळा बोलूं लागली आहे. तसेंच पळस व आम्रवृक्ष फुलल्यामुळें भ्रमर गुंजारव करीत आहेत.

### २ राग–बहार ताल–तिलवाडा

नई ऋत नई फूली नयो बेली बहारिया नयो कलियनको
नयो रस ॥ ध्रु. ॥
नयो नयो द्रुमन नयो नयो पातवा तापर भंवरा भयो बस ॥१॥

**अर्थ** :– नवीन ऋतु ( वसंत ) नव्यानें फुलला असून वेलींना नवीन बहार व कळ्यांना नवीन रस प्राप्त झाला आहे. झाडांना नवीन पालवी फुटली असून तीवर भ्रमर गुंग ( वश ) होऊन राहिले आहेत.

### ३ राग–बहार ताल–त्रिताल

कलियन संग करत रंगरलियां भंवर गुंजारे फूली फुलबारी चहूँ
ओर मोर बोले कोयलकी कूक सुनी हूक उठी ॥ ध्रु. ॥
लहर लहर लहरात सब बिरछन मोरी ले नार गरुवा भर आये
आज बागमें पुकार कीनेवाले राम बोले हर बार बार ॥१॥

**अर्थ** :– माझी बाग फुलली असून गुंजारव करून भ्रमर कळ्यांच्या–बरोबर शृंगार–चेष्टा करीत आहेत. चोहोंबाजूंस मोर व कोकिळांचा आवाज ऐकून ( माझ्या मनांत विरहानें ) व्याकुळता उप्तन्न झाली आहे. बागेंतील झाडें डोलत असून आज स्त्रिया घागर भरून घेऊन किनेवाले रामाचा ( कवि–माळी ) एक सारखा पुकार करीत आहेत.

### ४ राग – भैरव–बहार. ताल–झुमरा

नई डरियनपर कोयलिया डुरतिया राती माती आई
ऋत बसंत सुहावन ॥ ध्रु. ॥
सघन बेलरी फूल रहीली पात फूलपर लागत अत
मनभावन ॥ १ ॥

**अर्थ** –: आल्हाददायक वसंत ऋतु आल्यामुळें झाडाच्या नवीन डहाळचांवर कोकिळा अत्यंत प्रसन्नतेनें डोलत आहे. वेलींना पानाफुलांनी युक्त असा अत्यंत बहार आला आहे, तो अत्यंत मन मोहक वाटत आहे.



### ५ राग – भैरव–बहार. ताल–त्रिताल

डालरिया झुके रहे अरे हां रे बागमें नोने
नोने पातवा रे ॥ ध्रु. ॥
ऋतु बसंतकी बहार आये हो फूले गुलाब और
चमेलरिया रे ॥ १ ॥

**अर्थ** :– वसंत ऋतूला बहर आला असून सुंदरसुंदर पालवी फुटली असून ती डोलत आहे. गुलाब व चमेलीही फुलली आहे.

### ६ राग – वसंत–बहार. ताल–तिलवाडा

बरजो न मानेई रे बैरन कोयलिया कूक बुलाई
तैसो ही पपिया पिहू पिहू करही ॥ ध्रु. ॥
ये ऋत आई और अंबवा मोरे चहूँ देसमें फुलली
बहारी लाल बिना मन धीरज ना धराई ॥ १ ॥

**अर्थ** :– निषेध केला तरी तें न ऐकतां उलट ही वैरीण कोकिळा व पपिहा 'कुहू कुहू', 'पिहू पिहू' शब्द करीत आहेत. या वसंत ऋतूमुळें आम्रवृक्ष फुलला आहे. अशा वेळीं प्रियकरावांचून मन धीर धरत नाहीं.

६

## वर्षाऋतु–वर्णनाच्या चिजा

### १ राग–मिया मल्हार (विलंबित एकताल)

अत धूंदर दौरे आवेरे बदरुवा गरज गरज बरसन को
आवे रे ॥ ध्रु. ॥
दामिनि–से कंतचंद जियरा अत डर पावे पपिहा बुलावे
मोर शोर लागी रहे ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रियकररूपी चंद्रा, काळे-काळे ढग गरजून गरजून वर्षाव करूं लागले आहेत. विजेच्या चमचमाटानें माझा जीव अति भयभीत झाला आहे. मात्र पपिया व मोर ( त्यांना आनंद झाल्यानें ) यांनी ओरडून-ओरडून दंगा माजविला आहे.

## २ राग-मिया मल्हार (ताल-त्रिताल)

बिजली चमके बरसे मेहरुवा आई बदरिया गरज गरज
मोहे अतही डरावे ॥ ध्रु० ॥
घन गरजे घन बिजली चमके पपिहा पिहुकी टेर सुनावे
कहा करुँ कित जाऊँ मोरा अत जी तरसे रे ॥ १ ॥

अर्थ :- विजा चमकत आहेत; मेघ वर्षाव करूं लागले आहेत. मेघ गरजत गरजत येत आहेत, व मला फार भय दाखवीत आहेत. मेघ गर्जत आहेत; विजा चमकत आहेत. ' पपिया ' ' पी ' असा शब्द करीत आहे. मी आतां काय करूं ? कोठे जाऊं ? माझा जीव अत्यंत व्याकूळ झाला आहे.

## ३ राग-मिया मल्हार (ताल-त्रिताल)

बोलो रे पपिहरा अब घन गरजे अब घन गरजे ॥ ध्रु. ॥
ऊन ऊन कर आई बदरिया बरसन लागी सदारंगीले
महम्मद शाह दामिनिसे कंत चंद मोरा जियरा लरजे ॥ १ ॥

अर्थ :- मेघ आंता गर्जत आहेत. हे पपिया, तूं बोल, एकामागून एक ढग येत असून मेघवर्षाव सुरूं झाला आहे. हे प्रियकररूपी चंद्रा, विजेच्या कडाडण्यानें माझा जीव घाबरा झाला आहे.

( सदारंगीले-कवीचें नांव; महमदशाह-बादशहाचे नांव )

## ४ राग-गौड मल्हार (ताल त्रिताल)

पपी दादुरवा बुलाई पपिहा पिऊकी टेर सुनाई पियाकी
सुध आई ऐसो देख माई ॥ ध्रु. ॥



चमक चमक बिजली डराई याद पियाको मोहे दिलाई
रैन एक गरज गरज बरसे बदरुवा मोर बुलाई ॥ १ ॥

अर्थ :- हे सखी, पहा, ' पपिया ' व बेडूक यांचें ओरडणें ऐकून मला माझ्या प्रियकराची आठवण येत आहे. (एकतर) ही रात्रीची वेळ, त्यांत मेघ गर्जना करून वर्षाव करीत आहेत. विजा आपल्या झगझगाटानें भीति दाखवीत आहेत. मोर ओरडत आहे. या सर्वामुळें मला प्रियकराची एकसारखी आठवण होत आहे.

## ५ राग-गौड मल्हार (ताल-त्रिताल)

बलमा बहार आई, दादुर मोर पपिहा पिऊ पिऊ बोले
गत न्यारी ॥ ध्रु ॥
निशि अंधियारी दामिनी डरावे कोयल सबद सुनाई ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रियकरा, ( सर्वत्र ) आनंदीआनंद झाला आहे कारण बेडूक, मोर व पपिया बोलत आहेत. कोकिळाही शब्द करीत आहे. मात्र रात्र अंधारी असून विजा भीति दाखवीत असल्यानें ( तुझ्यावांचून ) माझी अवस्था मात्र भलतीच झाली आहे.

## ६ राग-मेघ मल्हार (ताल-झुमरा)

उमड घुमड घन आये गगनुवा ये बुंदनकी झरनिया
तरपत बिन उनके ॥ ध्रु. ॥
चहुँ ओर ठौर ठौर बिजली चमके हररंग ठौर ठौर
बर्रात मुरवा ये ॥ १ ॥

अर्थ :- धूमधडाक्यानें आकाशांत ढग जमून थेंबांचा वर्षाव करूं लागले आहेत. त्यामुळें ( प्रियकराच्या विरहानें ) मी व्याकूळ झालें आहें. मात्र चोहोंबाजूच्या विजेच्या चमकण्यानें मोर ओरडत आहेत.

( हररंग-कवीचें नांव )

## ७ रागः-मेघ मल्हार (ताल-द्रुत एकताल)

माँ चमके बिजलिया बरसे मेहरूवा बादर आई
अत जोर जोर ॥ ध्रु. ॥

बेग ही तो बुलावो री मोरे मनभाये उड री कोयलिया
पुरबैया तेहारी जोर ॥ १ ॥

अर्थ :- हे आई, विजा चमकून अत्यंत जोरानें पर्जन्य वृष्टि सूरूं झाली आहे. हे कोकिळा, शक्य तितक्या वेगानें पूर्व दिशेला उड्डाण करून माझ्या प्रियकराला सत्वर बोलावून आण.

## ८ राग-सूरदासी मल्हार (ताल-तिलवाडा)

गरजत आये बादर अत ही सुख पाये ॥ ध्रु. ॥
गरज गरज चहुँ ओर बरस रहे तब ही सदारंग बहुत
सुख पाये ॥ १ ॥

अर्थ :- गरजून गरजून चोहोंकडे मेघवर्षाव सुरूं झाला असल्यानें मला फार आनंद झाला आहे.

[सदारंग-कवि]

## ९ राग- सूरदासी मल्हार (ताल-त्रिताल)

घोर घोर घोर घोर बरसत मेहरुवा बिजलिया चमके अनत
काम जिन जावो मोरे पियरुवा ॥ ध्रु. ॥
ये बरखा ऋतु आवत है पिया बिन मेंको कछु ना सुहावे
मधुवा पिलावे गरुवा लगावे दौर दौर घोर घोर बरसत ॥ १ ॥

अर्थ :- विजा चमकत असून मुसळधार असा पाऊस पडत आहे. हे माझ्या प्रियकरा, अशा वेळीं तूं अन्यत्र कोठें जाऊं नकोस. हा वर्षा-ऋतु आला असल्याने मला तुझ्यावांचून कांहीं बरें वाटत नाहीं. म्हणून मद्य पिण्यास देऊन आलिंगन दे.

## १० राग- सूरदासी मल्हार (ताल-त्रिताल)

बादरवा बरसनको आये नन्ही नन्ही बूंदन चमक चमक
चंद चहूँ ओरते बिजलिया चमकत ॥ ध्रु ॥



कुंवर शाम नहीं आये सजनी कोन सोतन संग नेह
लगाये चहूँ ओरते बिजलिया चमकत ॥ १ ॥

अर्थ :- मेघवर्षाव सुरूं झाला असून विजा चमकत असल्यानें (त्या प्रकाशानें) पावसाचे लहान लहान थेंब थोडे थोडे चमकत आहेत. हे सखि, अद्याप श्रीकृष्ण आला नाहीं. कोणत्या सवतीच्या संगतींत गुंग झाला आहे कोण जाणें ?

## ११ राग-जयंत मल्हार (ताल-त्रिताल)

ऋतु आई सावनकी रिमक झिमक झिम झिम बुंदरिया
बरसे ॥ ध्रु. ॥
या समय मेरो सुहाग भाग पिया सन देखतही आली
री सोतन अति तरसे ॥ १ ॥

अर्थ :- श्रावण मास सुरूं झाल्यानें झिमझिम पाऊस पडत आहे. अशा वेळीं माझा प्रियकर माझ्याजवळ आहे हें माझें भाग्य आहे. तें पाहून माझी सवत (मत्सरानें) जळत आहे.

---

७

# रूप-गुण-वर्णनाच्या चिजा

## १ राग-तोडी, त्रिताल

काली काली कामरिया घुंगट पट लेत बंसी
बजावत माधुरिया ॥ ध्रु. ॥
सांवली सूरत मोहनी मूरत देखत ब्रिज नार भई
बावरिया ॥ १ ॥

**अर्थ** :- काळी घोंगडी लपेटून श्रीकृष्ण मधुर मुरली वाजवीत आहे. त्याची सांवळी मोहक मूर्ति पाहून व्रजांतील स्त्रिया बावरून गेल्या आहेत. ( मोहित झाल्या आहेत. )

## २ राग-आसावरी, वि. एकताल

भली बजाई रे तूने बांसरिया बनवारी रे ॥ ध्रु. ॥
अनेक रंग तरंग उपजावत मोह लई सब ब्रिज नारी रे ॥ १ ॥

**अर्थ** :- हे कृष्णा, तूं फार उत्तम बांसरी वाजवीत आहेस. नादाचे बहुरंगी तरंग उत्पन्न करून सर्व व्रजनारींना मोहून टाकिलें आहेस.

## ३ राग-आसावरी, ताल-वि. एकताल

ये माधो नेक निहारो ॥ ध्रु. ॥
सोभा सीले सागर गुनआगर सुंदर परम उद्रारो ॥ १ ॥

**अर्थ** :- या माधवाचें नीट दर्शन घ्या. हा सौंदर्याचा व शीलाचा सागर, गुणांची खाण, सुंदर व परम दयाळू आहे.

## ४ राग-मालश्री, त्रिताल

दीजो दरस मोहे चतुर भुजनकर शंख-चक्र-गदा-
पद्मधार कर ॥ ध्रु. ॥
पीतांबर औ, डंबर साजे गले मोतियनकी माल मनोहर ॥ १ ॥



**अर्थ** :- हे शंख-चक्र-गदा--पद्मधारी चतुर्भुज (परमेश्वरा), मला दर्शन दे. तुझ्या गळ्यांतील मोत्यांची माला, पीतांबर, आणि डोक्यावर मोरपिसांचा चंद्र शोभत आहेत.

## ५ राग-सोहनी, तिलवाडा

देखो रे पिया पिया तोरी नैननकी छब रे ॥ ध्रु. ॥
मुख कमलन बीच दंत जवाहिर लाल लब बीच
पानन बीरी ॥ १ ॥

**अर्थ** :- हे प्रिया, पहा तुझ्या डोळ्यांचें सौंदर्य ! तुझ्या कमळाप्रमाणें असणाऱ्या मुखांत रत्नाप्रमाणें दांत शोभत असून लाल ओठांमध्यें पानांचा विडा शोभत आहे.

## ६ राग-काफी कानडा, तिलवाडा

गोरे गोरे मुखपर बेसर सोवे और सोवे नैनन कजरा रे ॥ ध्रु. ॥
सीस फूल बेंदी सोवे कंठ मालापर और मोतियन गजरा रे ॥ १ ॥

**अर्थ** :- ( वधूच्या ) गोऱ्यापान मुखावर चमकी व डोळ्यांत काजळ शोभत आहे. डोक्यांत फुलांची बिंदी व गळ्यांतील माळांवर मोत्यांचा किंवा मोतियाचा गजरा शोभत आहे.

## ७ राग-केदार, तिलवाडा

जुगनूवा चमके रहो प्यारीके गरेबा ॥ ध्रु. ॥
गुरहीदार मोतीको लटकन दमके ॥ १ ॥

**अर्थ** :- प्रियेच्या गळ्यांत जुगनूं ( एक प्रकारचा दागिना ) चमकत आहे. तसेच सुरईच्या आकाराच्या मोत्यांचा चौकडा चकाकत आहे.

## ८ राग-भूप, त्रिताल

चमक चली मालनी बिजलिया हर गंध लावो सब फूलनिया
धूंडन निकसे जात आपने पिया ॥ ध्रु. ॥

रंग कुसुंबिक शालू पेहराई गले मोतनकी माल सोहनिया सैंया सैंया
करंहू पुकारे मैं परोंगी तोरे पैंया ॥ १ ॥

अर्थ :- हरतऱ्हेचीं सुगंधी फुलें घेऊन ही माळीण आपल्या प्रियकराला शोधून काढण्याकरितां ठुमकत मुरडत चालली आहे. तिनें कुसुंबी रंगाचा शालू परिधान केला असून गळ्यांत मोत्यांची माळ शोभत आहे. ती एकसारखा धांवा करीत आहे कीं, ' हे प्रियकरा, मी तुझ्या पायां पडतें. ' ( मला दर्शन दे- मला भेट दे. )

## ९ राग-आसावरी, त्रिताल

कोन रिझावन जायेरी अलबेली नार चली लपक छपकसो नेवरकी
झनकार करे तू ॥ ध्रु. ॥

बाट घाट सब रोकत रोकत किन घर अरे जावो चुनरिया पहेरी
प्यारी तूं ॥ १ ॥

अर्थ :- हे सुंदर स्त्रिये, तूं इतकी नटून-थटून पैंजणांचा झंकार करीत तूं कोणाला रिझविण्याकरितां निघाली आहेस ? साडी नेसून रस्त्यारस्त्यावर चौकशी करीत तूं कोणाच्या घरीं निघाली आहेस ?

## १० राग-गौड सारंग, तिलवाडा

कजरारे प्यारी तोरे नैन सलोने मदभरे पियाके प्यारे
येरी अंजन बिन ॥ ध्रु. ॥

चंचल चपलासी चपलासी चमकत खंजनवा दृग वारे वार
डारे येरी अंजन बिन ॥ १ ॥

अर्थ :- हे प्यारी, तुझे काळजयुक्त सुंदर रसीले नेत्र काजळा-वांचूनच प्रियकराला आवडणारे आहेत. तुझे डोळे विजेप्रमाणें चंचल असून खंजनाचे ( एक सुंदर डोळ्यांचा पक्षी ) नेत्रही तुझ्या डोळ्या-वरून ओवाळून टाकावेत.

## ११ राग-केदार, तिलवाडा

बन ठन कहाँ जू चली ऐसी को मनभावत सावरे
सलोने कन्हाई ॥ ध्रु. ॥



दुजकेसो चंद्रमा नीकोई लागत छुपछुप देत दिखाई ॥ १ ॥

अर्थ :- तूं नटून-थटून कोणाला रिझविण्यास जात आहेस ? सावळ्या, सुंदर कृष्णास काय ? द्वितीयेच्या चंद्राप्रमाणें तुझें हे लपून-छपून जाणें अत्यंत आकर्षक आहे.

## १२ राग-छायानट, त्रिताल

बंसीके बजैया अजि काहा जा बसे हो ॥ ध्रु. ॥

गोपी ग्वालन संग लिये डोले उठ क्यौं न बोले सदारंग
कैसे हो ॥१॥

अर्थ :- हा मुरलीवाला ( श्रीकृष्ण ) आज कोठें जाऊन बसला आहे न कळे. ( तो पहा ) गोपगोपींच्यासह डोलत आहे. सदारंग, ( कवि ) म्हणतात, ( येथून ) उठून एक शब्दही बोलण्यास कसा तयार होत नाहीं पहा ! ( इतका गुंग झाला आहे. )

## १३ राग-मालगुंजी, वि. एकताल

बनुमे चरावत गैया लाल लकुट लिये देखो सिर मोर-
-पंख धरे ॥ ध्रु ॥

मोर मुकुट सीस अधिक बिराजे संग सखा बिरछनकी छैया ॥१॥

अर्थ :- हातांत लाल काठी व डोक्यावर मोरपिसे व मोरमुगुट अधिकच शोभत असून सभोंवार वृक्षाच्या छायेप्रमाणें संवगडी शोभत आहेत. ( असा श्रीकृष्ण ) वनांत गाई चारीत आहे.

## १४ राग-बागेश्री, त्रिताल

आवो मोरे लाला रसीले मोहन प्यारे ॥ ध्रु ॥

मैं बली जावू तुम्हारे गुननपर नीकी बेन बजावो ॥ ध्रु. ॥

अर्थ :- हे लाडक्या रसिक मोहना, ये. मी तुझ्या गुणांवरून कुरवंडी करीन. तूं सुंदर वेणू वाजव.

### १५ राग–बिलासखानी तोडी, वि. एकताल

नीकी घुंगरिया ठुमकत चाल चलत है ॥ ध्रु. ॥
सुनत साद जिया बेकल होत सदारंग लेहो बलैया ॥ १ ॥

**अर्थ** :– ( हे प्रिये, ) पायांत पैंजण घालून ठुमकत ठुमकत चालतांना होणारा ( पैंजणाचा ) आवाज ऐकून जीव व्याकूळ होत आहे. तुला धन्यवाद असो. ( सदारंग–कवी )

### १६ राग–ललत, तिलवाडा

बरनी न जाये री उपमा ये मुखचंदकी ॥ ध्रु ॥
केसर अतर अरगजा लगावो अंग सुध बिसरत मुख देख
मदमातकी ॥ १ ॥

**अर्थ** :– तुझ्या मुखचंद्राचें वर्णनच करतां येत नाहीं. त्यास उपमाच नाहीं. तारुण्यानें मुसमुसणाऱ्या हिचें केशर, अत्तर, अरगजा लावलेलें मुख पाहून देहभान नाहीसेंच होतें.

### १७ राग-पूरिया, वि. एकताल

पिया गुनवंत सबही बातनुमें निस दिन करत रहत चतुराई ॥ ध्रु. ॥
एक गुन नाही मोमें रंगीले इत चीत प्रीत लगाई ॥ १ ॥

**अर्थ** :– माझा प्रियकर सर्वच बाबतींत गुणवान आहे. रात्रंदिवस चतुराईनें वागतो. माझ्या ठिकाणीं एकही गुण नसला तरी तो रसिक प्रियकर माझ्याशीं अंतकरणपूर्वक प्रेमानें वागतो.

---

८

## मीलनाच्या चिजा

### १ राग हमीर. वि. एकताल

ये लाल मनकी सांची कहो अपने अब तुम मोसो
जियाकी ॥ ध्रु० ॥
कल न परत रैन दिन तरपत जल बिन मीन सुघर
सुघर उघर उघर बात रसकी ॥ १ ॥

**अर्थ**– हे प्रियकरा, आपल्या मनांतील खरी खरी गोष्ट काय असेल ती मला सांग. मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं. पाण्यावांचून मासा ज्याप्रमाणें तडफडतो तशी मी ( तुझ्या प्रेमावांचून ) व्याकूळ झालें आहें. म्हणून प्रेमाची गोडगोड भाषा व्यक्त कर.

### २ राग–गौडमल्हार. तिलवाडा

काहे हो हमसों पीतम आँखें फेर डारे ॥ ध्रु ॥
का मोपे चूक परी सुधार लेहो सदारंग तूपर वारे ॥ १ ॥

**अर्थ** :– हे प्रियकरा, तूं माझ्यावर कां रागावला आहेस ? माझ्याकडून काय चूक झाली असेल ती सुधारून घे. तुझ्यावरून मी कुरवंडी करीन. ( सदारंग–कवि )

### ३ राग–भैरव. वि. एकताल

हो गई भोर जानी मोसों बोलो जी ॥ ध्रु ॥
अंबुवाकी डारीपर कोयल बोले पपिया करत
लागी पी पी पी ॥ १ ॥

**अर्थ** :– हे (प्रियकरा), पहांट झाली. माझ्याशीं बोल. आम्रवृक्षाच्या डहाळीवर कोकिळा बोलूं लागली असून 'पपिया' 'पी' 'पी' असा आवाज करूं लागला आहे.

## ४ राग–यमन. त्रिताल

हरुवा मोरा देहो मँगा नाकर में गारी दूंगी ना
रहौंगी तुमसों बलुमा ॥ ध्रु० ॥
जो दोगे तुम मोतन हारुवा तब लागोंगी
तुमरे गरुवा ॥ १ ॥

**अर्थ** :– हे वल्लभा, माझा हार आणून दे. नाहींतर मी तुला शिव्याशाप देईन व तुझ्या जवळसुद्धां राहणार नाहीं. तूं जर मला मोत्यांचा हार देशील तर मी तुला आलिंगन देईन.

## ५ राग-शंकरा. तिलवाडा

सो जानु जी जानु बालम् मोरा देखे तेहारी
सब लछन ॥ ध्रु० ॥
उतर बनावत बन नहीं आवत कहे देत सब लछन ॥ १ ॥

**अर्थ** :– हे माझ्या प्रियकरा तुझीं सर्व लक्षणें मीं जाणलीं आहेत. तूं उत्तर देऊं ( बनवाबनवी करूं ) पहात आहेस पण तुला तें जमत नाहीं. तुझीं लक्षणेंच सांगताहेत.

## ६ राग–छायनट. तिलवाडा

करत हो मोसों नेहाकी झूठी झूठी बतियाँ
बनाये बनाये ॥ ध्रु० ॥
वे तो हम हूँ जानत तुम हो जानत सरस जग
जानत हियरसो हियरा दे सजन ॥ १ ॥

**अर्थ** :– तूं माझ्याशीं प्रेमाच्या खोट्या खोट्या गोष्टी करून मला फसवीत आहेस तें मी जाणतें. तुला तर माहीतच आहे. सदय लोकांनाही माहीत आहे. तरी हे प्रिया, आतां हृदयाशीं हृदय मिळव. ( खरें खरें प्रेम कर. )

## ७ राग छायानट. त्रिताल

पल पल सोच बिचार करूं मैं काहे प्रीतम
अजहूँ न आये ॥ ध्रु० ॥



भोर भये तब आये पियरुवा सब सोतनके
द्वार बसाये ॥ १ ॥

**अर्थ** :– माझा प्रियकर अजून कां आला नाहीं म्हणून मी क्षण–क्षणाला विचार करतें आहें. ( इतक्यांत ) सगळ्या सवतींच्या घरीं जाऊन आतां पहाट झाल्यावर तो आला आहे पहा.

## ८ राग–छायानट. त्रिताल

बार बार गये हार तुमसों काहे न मानो
हमरी बतियाँ ॥ ध्रु० ॥
जावो जावो तुमिसन हम नहीं बोलें तूहि
गमाये सगरी रतियाँ ॥ १ ॥

**अर्थ** :– वारंवार (सांगूनही) तूं माझें बोलणें कां ऐकत नाहींस ? मी हरलें. जा. मी तुझ्याशीं बोलतच नाहीं. तूं अशीच सर्व रात्र (बाहेर) घालविलीस.

## ९ राग–गौडमल्हार. त्रिताल

सुरंग चुनरिया देहो मँगा प्यारे मोरे बलमा
मैंको ॥ ध्रु० ॥
येरी लाल मैं पैरोंगी रहस रहस गर नीके
लगा ॥ १ ॥

**अर्थ** :– हे प्रिया, मला सुरंगी रंगाची साडी आणून दे. हे लाल ( प्रियकरा ), मी साडी नेसीन व मग तूं प्रेमाने मला आलिंगन दे.

## १० राग–आसावरी. त्रिताल

भोर गई मिलन भइलवा मोरे में पीतम छिगवा
रहस मंदरवा बाजे मंदिलरा ॥ ध्रु ॥
आवो गावो नाचो सब सखियाँ सहेली सदारंग
गर लागी रहिलवा ॥ १ ॥

अर्थ :- आज पहाटें माझें मीलन झालें. मी प्रियकराजवळ असून मंदिरांत आनंदानें वाद्यें वाजत आहेत. सर्व मैत्रिणींनो, या. गायन-नृत्य चालूं द्या. कारण सदारंगाच्या प्रेमांत (आलिंगनांत) मी दंग झालें आहें.

## ११ राग-मुलतानी. तिलवाडा

लाडी थारी बातनू चाकर रे ॥ ध्रु ॥
ते तुम्हारे मिला आवो जी शाम लाडी
करे मिजमानी वे ॥ १ ॥

अर्थ :- हे सखि, मी तुझी दासी आहें. तो कृष्ण तुला भेटण्यास येणार आहे. त्याला चांगली मेजवानी दे.

## १२ राग-शामकल्याण. द्रुत एकताल

ऐसा तुमको में जानत हूँ बलमा तुम हमसन
करत ऐसी चतुराई ॥ ध्रु० ॥
हमसे छुप छुप सोतन संग जागत बलमा तुम
हमसन करत ऐसी चतुराई ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रियकरा, तूं माझ्याशीं चतुराई करण्यास ( मला बनविण्यास ) पहातोस. पण मी तुला पूर्ण जाणून आहें. मला चोरून तूं माझ्या सवतीबरोबर जागतोस व मला फसवूं पहातोस. अशी माझ्याशीं लबाडी करतोस.

## १३ राग-पूरिया. त्रिताल

में मिली आई आपने पियाको मोरी मा
आइलो आइलो करिलो आनंदबधा ॥ ध्रु० ॥
ममदसा मिलन आवेरी तनमनधन
सब उरझा ॥ १ ॥

अर्थ :- हे आई, मी आपल्या प्रियकरास भेटून आलें असल्यानें आनंदीआनंद करा. प्रियकराच्या भेटीच्या आनंदानें माझें तनमनधन उल्हसित आलें आहे.



## १४ राग-पूर्व्या कल्याण. द्रुत एकताल

डारूंगी हारवा पेहरवा तोरे गरुवा तुम
पर नित जावूं वारी ॥ ध्रु० ॥
बहुत दिननके बाद आवन भइला पूरन
आस भई मोरी ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रियकरा, मी तुझ्या गळ्यांत हार घालतें. व तुझ्या-वरून कुरवंडी तर नेहमींच करते. फार दिवसानंतर तुझें आगमन झालें आहे. माझी मनीषा पूर्ण झाली.

## १५ राग-पूरिया. त्रिताल

पिया आये मोरे मनभाये सुख तनमन
को रंगवारे ॥ ध्रु ॥
वार गया उस दिन पर सजनी पिया
आये गर लागे ॥ १ ॥

अर्थ :- माझ्या तनमनास आनंदित करणारा माझा प्रियकर आला आहे. हे सखि, ज्या दिवशीं त्यानें येऊन मला आलिंगन दिलें त्या दिवसा वर मी कुरवंडी करतें.

## १६ राग-सुधराई. त्रिताल

बलमा रे चुनरिया मैंको लाल रंगा दे
जैसी तोरी पगिया वैसी मोरी रे ॥ ध्रु० ॥
रंग रंगेली और चटकेली मोहीं भोर
मँगादे ॥ १ ॥

अर्थ :- हे वल्लभा, तुझ्या पगडीप्रमाणें लाल रंगाची बुट्टीदार साडी मला सकाळीं आणून दे.

---

९

# विरह-गीतें

## १ राग-गौड सारंग. (त्रिताल)

पल न लागी मोरी आँखियाँ आलि बिन पिहू मोरा
जिया घबरावे चैन नहीं आवे घरी पल छिन दिन
रैन ॥ ध्रु.० ॥
बीर पथकवा लेहो संदेसवा पियासन कहिये हमारी
व्यथा तुम्हारे दरसको बिरहा ॥ १ ॥

अर्थ :- हे सखि, प्रियकरावांचून माझा जीव घाबरा झाला आहे. डोळ्यास डोळा लागत नाहीं. एक क्षणभरही चैन पडत नाहीं. हे प्रवासी बंधो, माझा संदेश घेऊन जा व त्याला माझी विरहावस्था कथन कर व तुझ्या दर्शनाकरितां मी व्याकूळ झाल्याचें सांग.

## २ राग-मुलतानी. (वि. एकताल)

अरे पाथकवा मोरे पियाको ले आवो ॥ ध्रु० ॥
बेगी जाय समुझावो कंथको उनबिन लागी मोहे बिरह
गहानु रे ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रवासी, माझ्या प्रियकराला घेऊन ये. सत्वर जाऊन त्याला समजावून सांग कीं, तुझ्यावांचून मला हा कठीण विरह व्याकूळ करीत आहे.

## ३ राग-मारवा. (वि. एकताल)

पिया मोरे आनु देस गइलवा ना जानूं कबलौं
आ ई ॥ ध्रु० ॥
उनके दरस देखावेको आँखियाँ तरस गईं उनकी देख
मोहे भावई ॥ १ ॥



अर्थ :- माझा प्रियकर अन्य देशास गेला आहे. केव्हां परत येईल कोण जाणे ! त्याच्या दर्शनाकडे माझे डोळे लागून राहिले आहेत. (कारण) त्याचा नेत्रकटाक्ष मला आवडतो.

## ४ राग-ललत. (तिलवाडा)

रैनका सपना कैसे कहौं री ॥ ध्रु॥
सोवत सोवत आँख खुली जब कोऊ न पायो अपना ॥ १ ॥

अर्थ :- (हे सखि,) रात्रीचें स्वप्न कसें सांगू ? (स्वप्नांत प्रियकर आला) मात्र स्वप्नांतून (झोपेंतून) जागे होऊन पाहते तों आपलें असें कोणीच दिसलें नाही.

## ५ राग-आसावरी. (त्रिताल)

पिया मोरा गैलो बिदेसवा कैसे करूँ सजनी कल नहीं
परे पल छिनवा ॥ ध्रु० ॥
हमारे पितमको जो कोई लावो मोतियनकी थल भर
भर देहौं और पैनावूं करको कंगनुवा ॥ १ ॥

अर्थ :- हे सखि, माझा पति परदेशास गेल्यामुळे मला क्षणभरही चैन पडत नाहीं. मी काय करूं ? माझ्या प्रियकराला जो कोणी घेऊन येईल त्यास मी तबक भरून मोती ( बक्षीस ) देऊन हातांत (सोन्याचें) कंकण घालीन.

## ६ राग-जेतकल्याण. (तिलवाडा)

आज क्यों नही आये पिया मोरे किन सोतन
बिरमाये ॥ ध्रु० ॥
दिन नहीं चैन रैन नहीं निंदिया कैसे कर जात समाये ॥१॥

अर्थ :- आज माझा प्रियकर कां आला नाहीं ? कोणत्या सवतीनें त्याला गुंतवून ठेविलें आहे ? मला दिवसां चैन नाहीं रात्रीं झोंप नाहीं. हा काळ मी कशी कंठूं ?

## ७ राग-भीमपलास. (त्रिताल)

गरुवा हारुवा डारूँगी में जो पिया आवे आंगनुवा ॥ ध्रु० ॥
चतुर सुघर बालमुवा मोरा कौन देस जा बिलम रहिलवा
सदारंगको जाय सुनावो उनके कान भनक बारी मैं ॥ १ ॥

अर्थ :- जेव्हां माझा प्रियकर (घरी) अंगणांत येईल तेव्हां मी त्याच्या गळयांत हार घालीन. चतुर व शहाणा असा माझा प्रियकर कोठें (कोणत्या देशास) गूंतून राहिला आहे, कोण जाणे ! त्या माझ्या सतत आनंदी असणाऱ्या प्रियकरास (सदारंगको) कानांत जाऊन सांगा कीं, तुझ्यावरून मी स्वतःला ओंवाळून टाकलें आहे.

## ८ राग-बहार. (त्रिताल)

कैसे निकसी चांदनी शरद रैन मदमात विकल भई
पिऊ पिऊ टेरत भामिनी ॥ ध्रु० ॥
छिन आंगन छिन जात भवनमें छिन बैठत छिन बारीहूँ
दौरत कल न परत तरपत बिरहाकुल चमकत जो दुति
दामिनी ॥ १ ॥

अर्थ :- शरद ऋतूंतील हें चांदणें कसें सुंदर पडलें आहे पहा ! तें पाहून ती सुंदर स्त्री मदोन्मत्त होऊन 'हे प्रियकरा' असा सारखा धांवा करीत आहे. ती क्षणांत अंगणांत जाते तर क्षणांत घरांत येते; क्षणांत खालीं बसते तर क्षणांत बागेकडे धांवते. बेचैन व व्याकूळ झाल्यानें ती एकाद्या विजेच्या झळाळीप्रमाणें चमकत आहे. (चंचलता प्राप्त झाली आहे.)

## ९ राग-मालकंस. (वि. एकताल)

पीर न जानी रे मियाँ देखे तेहारी अनोखी मीत ॥ ध्रु० ॥
ऐसो निरमोही भइलवा बलुमा कवन गाँवकी रीत ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रियकरा, तूं माझी व्यथा जाणीत नाहींस. तुझें हें बिचित्र प्रेम मी जाणलें. तूं इतका निष्ठुर कसा झालास ? तुझी ही कोणत्या गांवची रीत ?



## १० राग-पूर्वी. (त्रिताल)

कगुवा बोले मोरी आटरिया आटरिया सगुन भइलवा
सखी री कुच भुज फरकन लागे ॥ ध्रु० ॥
आवन करो तुम मोरे पियरुवा डारूँ गले फूलनके हारुवा
सखी री उनपर तनमन वारूं ॥ १ ॥

अर्थ :- माझ्या गच्चीवर कावळा बोलत आहे हा शकुनच आहे. तसेच माझी स्तनाग्रें व खांदा स्फुरण पावूं लागला आहे. हे प्रियकरा, तुझें आगमन होऊं दे. तुझ्या गळयांत मी फुलांचा हार घालीन. हे सखि, मी त्याच्यावरून तनमनाची कुरवंडी करीन.

## ११ राग-तोडी. त्रिताल)

पतिया पथकवा मोरे पियासन मोरा संदेसा बेग
ले आ ॥ ध्रु० ॥
घरि घरि पल पल छिन छिन मैंका जुगल्यों बिततु
है बेग ले आ सिरी हो छतिया ॥ १ ॥

अर्थ :- हे प्रवासी, माझ्या प्रियकराकडे माझा संदेश पोंचवून त्याला लवकर घेऊन ये. मला प्रत्येक क्षण युगाप्रमाणें वाटत आहे. त्याला लवकर घेऊन ये म्हणजे माझें हृदय (मन) शांत होईल.

## १२ राग-ललत. त्रिताल

पिया पिया करत पपीयरा उड री कोयलिया कवन
देस मोहे, पियाके मिलन कब होवे ॥ ध्रु ॥
झिंगर झिंगार दादुर बोले मुरवा बोले बनबनके
आवन करो पीतम मनरंगके मगन भये सब घरके लुगवा ॥१॥

अर्थ :- पपियरा 'पिया पिया' शब्द करीत आहे. हे कोकिळे तूं उड्डाण कर. माझा प्रियकर कोणत्या देशाला गेला आहे ? त्याची व माझी गांठ केव्हां पडेल ? बेडूक 'झिंगर झिंगर' असा आवाज करीत असून रानींवनीं मोर बोलूं लागले आहेत. हे वल्लभा, तूं सत्वर ये.

( या उत्साही वातावरणामुळें ) सर्व घरांतील लोक आनंदमग्न झाले आहेत.

## १३ राग–मारवा. त्रिताल

पिया बिन जियरा निकसे जात में कहूँ कैसे अपने मनकी
बातें ॥ धृ. ॥
रैन दिना मोहे कल न परत है चितरो सगरो गयो उनके
साथे ॥ १ ॥

अर्थः– प्रियकरावांचून माझा प्राण बाहेर पडूं पहात आहे. माझ्या मनाची रहस्यें मी कशीं सांगूं ? मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं. माझें सगळें चित्त त्याच्या बरोबर गेलें आहे.

## १४ राग यमन. वि. एकताल

कै सखि कै सखि करिये भरिये दिन ऐसे लालनके संग ॥ धृ. ॥
सुन री सखी में का कहूँ तोसे उनहीके जानत ढंग ॥ १ ॥

अर्थः– हे सखि, मी काय करूं ? अशा या प्रियकराच्या संग–तींत दिवस कसे घालवूं ? हे सखि, ऐक. मी तुला काय सांगूं ? तूं त्याचे ढंग जाणतेसच.

## १५ राग–ललत. तिलवाडा

ये मोरे घर आवो मोरा पी तो करेहूँ आनंद बधावो ॥ धृ. ॥
प्यारेको जो कोई ले आवो तबहूँ जानूं लाखन पायो ॥ १ ॥

अर्थः– हे वल्लभा, तूं घरीं परत ये म्हणजे मी आनंदोत्सव करीन. माझ्या प्रियकरास जेव्हां कोणी घेऊन येईल, तेव्हां ती मी लाखाची गोष्ट झाली असें समजेन.

## १६ राग–ललत. त्रिताल

पल बिछरत मोहे चैन नहीं अब कैसे करूँ पुकार पलपल ॥ धृ. ॥
बेगी दरस दो मोरे सदारंग में जावूं उनके बलबल ॥ १ ॥



अर्थः– मला एक क्षणही ( प्रियकरावांचून ) चैन पडत नाहीं. मी क्षणाक्षणाला कसा पुकार करूं ? हे माझ्या सदारंगा, मला लवकर दर्शन दे. मी तुला धन्यवाद देईन.

## १७ राग–जयत. तिलवाडा

प्यारे बलमा मोरे अब तुम नेक ना लीनी मोरी खबर ॥ धृ. ॥
ध्यान धरत हूँ प्यारे पीतम सैंया हम होवे ग्यानी तुम निपट
चतुर ॥ १ ॥

अर्थः– हे प्रियकरा, तूं माझी नीट चौकशीसुद्धां करीत नाहींस. मी तुझें ध्यान करीत आहे. तूं फार चतुर आहेस, हें मी समजून चुकले.

## १८ राग–वसंत. तिलवाडा

भँवरा रे दूर दूर, तेरोसो अंग रंग है जिनको तिन मेरो चित
लियो चूर चूर ॥ धृ. ॥
जबलग तरुन फूल महकत है तबलग रहत हुजूर जूर तुम
शाम अरे मतलब मधुकर लेत कली रस घूलघूल ॥ १ ॥

अर्थः– हे भ्रमरा ! तूं दूर हो. कारण ज्याचा रंग तुझ्या अंगा–सारखा आहे त्यानें ( श्रीकृष्णानें ) माझें मन चोरून नेलें आहे. जोंपर्यंत फुलावर फुलाचा सुगंध दरवळत असतो तोंपर्यंतच तूं त्याच्याशीं लगट करतोस. अरे मतलबी कृष्णवर्ण भ्रमरा ! तूं घुलवून घुलवून कळ्यांचा रस ग्रहण करतोस.

## १९ राग–जेताश्री. धीमा त्रिताल

जबते पिहू सपने आये तबते निंदरिया नहीं आये ॥ धृ. ॥
रैन दिना मोहे तनिके रंगीले सेजलिया न सुहावे ॥ १ ॥

अर्थः– प्रियकर माझ्या स्वप्नांत आल्यापासून मला झोंप लागत नाहीं. हे रसिक प्रियकरा, रात्रंदिवस मला ही शय्या जरासुद्धा बरी वाटत नाहीं.

### २० राग--भटियार. रूपक

पिया बिन मोहे कल न परत ॥ धृ. ॥
सगरी रैंन मोरे नहीं आये पिया किन सोतन बिरमाये ॥ १ ॥

अर्थः– प्रियकरावांचून मला क्षणभरही चैंन पडत नाहीं. सगळी रात्र तो आला नाहीं. कोणत्या सवतीनें त्यास गुंगवून ठेबिलें आहे?

---



# कृष्ण–लीला

### १ राग–गौड सारंग. वि. एकताल

जिन करो लरकेय्या सैंया छाँड दे मोरी बैया सैंया ॥ ध्रु. ॥
सास ननंदकी छाँड देहो मेहर बात ना कर बाँ कन्हैया सैंया ॥१॥

अर्थ :– हे कृष्णा, माझ्याशीं दंगामस्ती करूं नकोस. माझा हात सोड. माझी सासू, नणंद माझी गय करतील ही गोष्टच सोडून दे म्हणून कन्हैया मला विलंब करूं नको.

### २ राग–अडाणा. त्रिताल

गगरी मोरी भरन नहीं देत धीट लंगरुवा मतवारो ॥ ध्रु ॥
जित जाऊँ उत आडोंई दौरत अब ना रहूँ मैं तोरी नगरी ॥१॥

अर्थ :– हे खोडकर व धीट कृष्णा, तूं माझी घागर भरूं देत नाहीस. जिकडे जाईन तिकडे आडवतोस. मी आतां तुझ्या गांवांतच राहणार नाहीं.

### ३ राग–कामोद. त्रिताल

अधर धरत मुरली साँवरो रोकत टोकत जमुना तीर ठाडो रार करत मोपे कन्हाई ॥ ध्रु ॥
संग सखी सब रहे सहेली देखत सब ही मगवाको लुगवा लाज आवत मोपे तन ना छिवो री ॥१॥

अर्थ :– हे सांवळ्या कन्हैय्या, यमुनेच्या तीरीं अधरावर मुरली ठेवून, मला अडवून तूं माझ्याशीं दंगामस्ती करीत आहेस. माझ्याबरो–बर इतर स्त्रिया असून रस्त्यावरून येणारे जाणारे लोक माझ्याकडे पहात असल्यानें मला लाज वाटत आहे. माझ्या अंगाला हात लावूं नकोस.

## ४ राग–हिंडोल. त्रिताल

मग मत रोको कान्ह हमारे काहे को मोरी गागर फोरत हमहूँ
दासी तेहारी ॥ ध्रु. ॥
तुम ब्रिजराज नंदके लाला हम ब्रिखभान दुलारी रार करत हमसे
कुंजनमों देहूँ अब में लाखन गारी ॥ १ ॥

**अर्थ :–** हे कृष्णा, माझी वाट अडवूं नकोस माझी घागर कां फोडीत आहेस ? मी तुझी दासी आहे तूं व्रजराज नंदाचा पुत्र तर मी वृषभानाची मुलगी आहें तूं कुंजवनांत माझ्याशीं दंगा करीत आहेस. पहा, मी तुला लाख शिव्या देईन.

## ५ राग–यमन. त्रिताल

लंगर तूरे कधी न छिवो री मोरी गगरिया भरी अब देहूँ गारी
ब्रिजनारी निरख निरख हँस हँस देत मोहे तारी ॥ ध्रु. ॥
तुम तो महाधीट पी अत तन लागोई आवत धावत अत बारबार
मैंसन हेरत हेरत हो लाजन मरी जात हूँ ब्रिजनार ॥ १ ॥

**अर्थ :–** हे कृष्णा, तूं मला कदापि स्पर्श करूं नकोस. माझी घागर भरलेली आहे. मी आतां शिव्या देईन. सर्व व्रजांगना मजकडे पाहून हंसत हंसत मला टाळी देत आहेत ( चेष्टा करीत आहेत. ) तूं तर मोठा धीट व अतिशय माझ्याशी लगट करतोस धावत येऊन वरचेवर माझी टेहेळणी करतोस त्यामुळे मी ही व्रजनारी लाजेनें चूर होऊन जात आहें.

## ६ राग–मारूबिहाग. त्रिताल

कैसे कर जावूं में बजरुवा रोकत मोहे शाम कन्हैया ॥ ध्रु. ॥
दौरत आये बीच डगरुवा खींचत आंचल पकरत बैंया ॥ १ ॥

**अर्थ :–** मला श्रीकृष्ण अडवीत आहे. आतां मी दही विकण्यास बाजारांत कशी जाऊं ? पहा हा कन्हैया डगरी खालून धावत येऊन माझा पदर खेंचून हात पकडूं पहात आहे.



## ७ राग–आसावरी. त्रिताल

कान्ह न कर मोंसे रार अब री जा कहियो पुकार लंगर झगर
गगरिया मोरी दीनी डाले ॥ ध्रु. ॥
अंचर गहिलो जा जसोदासो कहियो जा आपने लंगर धीटको
सम्हाले ॥ १ ॥

**अर्थ :–** ( हे सखी ! ) कृष्णानें माझ्याशीं दंगामस्ती करून आणि झगडून माझी घांगर फोडली असें ओरडून सांग. यशोदेचा पदर पकडून तिला सांग कीं, आपल्या खोडकर कृष्णाला संभाळ.

## ८ राग–मुलतानी. त्रिताल

हमसे तुम रार करोगे रे तू तो लंगर धीट मग रोके
ठाडो रे ॥ ध्रु. ॥
सुन पावे मोरी सास ननंदिया करेंगी चरचा अबकी बेर तुम
पार करोगे रे ॥ १ ॥

**अर्थ :–** ( हे कृष्णा, ) तूं माझी वाट अडवून माझ्याशीं दंगा–मस्ती करीत आहेस. ऐक, माझी सासू, नणंद येतील व मग चर्चा करीत बसतील. आतांची वेळ मला जाऊं दे.

## ९ राग–भीमपलास. त्रिताल

मानत नाहीं लंगरवा धीट वे तो बरजोरी करत में क्या री
करूँ सखी ॥ ध्रु. ॥
हूँ तो नीर भरन जाती थी जमुना तीर मोहे पकर गैलमें झटके
चीर अब में क्या री करूँ सखी ॥ १ ॥

**अर्थ :–** हे सखि, हा धीट श्रीकृष्ण दंगामस्ती करीत आहे. ऐकत नाहीं. आतां मी काय करूं ? मी यमुनेच्या तीरावर पाणी भरण्यास जात असतांना रस्त्यांत मला पकडून माझा पदर ओढीत आहे.

## १० राग–हमीर. त्रिताल

धीट लंगरुवा कैसे घर जाऊँ सुन पावे मोरी सास ननंदिया छांड
दे मोहे ॥ ध्रु. ॥

हूं चली पनघटवा ठाडो कौन बहाने प्यारे बलमा छीन लई मोरी सीस गगरिया बरजोरी पिया आवे सुंदरवा कैसे घर जाऊँ ॥ १ ॥

अर्थ :- मी पाणवठ्यास जात असतां खोटा बहाणा करून, वाटेंत उभा राहून श्रीकृष्णाने जबरदस्तीने माझी घागर काढून घेतली. हे धीट कृष्णा, माझी सासू, नणंद इतक्यांत येईल मला जाऊं दे. ( घागरी शिवाय ) मी घरी कशी जाऊं ?

## ११ राग--केदार. तिलवाडा

सीखे हो छलबल येरी नटनागर येरी नटनागर ॥ धृ. ॥
मोर मुगुट सीस अधक बिराजे मानभरे तुम गुनसागर ॥ १ ॥

अर्थः- हे कृष्णा, तूं छळवाद करावयास कोठें शिकलास ? तुझ्या डोक्यावर मोरपिसांचा मुगुट अधिकच शोभत आहे तूं मानी असून गुणांचा सागर आहेस.

## १२ राग--मालकंस. त्रिताल

लंगर धीट तोहे राम दुवाई जिन छिवो मोरी बाही ॥ धृ. ॥
आवत जावत कर पकरत हैं ले भागे सिरकी गगरिया रे कान्ह तोहे लाज न आवत लंगर धीट जमुना बीच रे ॥ १ ॥

अर्थः- हे कृष्णा, तुला रामाची शपथ आहे. माझ्या हाताला स्पर्श करूं नकोस. येतां जातां माझा हात पकडून माझ्या डोक्यावरची घागर काढून घेतलीस (फोडलीस). या यमुनेमध्यें असा दंगा करतांना तुला लाज वाटत नाहीं काय ?

## १३ राग--शुद्ध सारंग. त्रिताल

मोरे चितचोरे लाला झटक रहे चुनरिया ॥ धृ. ॥
नगर बगरके लोग गुनत हैं हा हा परूँ तोरे पैयां ॥ १ ॥

अर्थः- हे माझें चित्त चोरणाऱ्या प्रिया (कृष्णा) तूं माझा पदर ओढीत आहेत. नगरांतील लोक ऐकत आहेत. मी तुझ्या पायां पडतें.



## १४ राग--तोडी. तिलवाडा

छेइलवा तुम हो धीट अत निपट हाटिले संग लागे मोरे आवे ॥ धृ ॥
जमुनाके नीर तीर गैया चरावत ये बांसुरीके अत ही धून सुन गोपनको सुनावे ॥ १ ॥

अर्थः- ( हे कृष्णा ) तूं अत्यंत धीट, फार हट्टवादी व रंगेल आहेस. माझा पिच्छा पुरवीत आहेस. यमुनेच्या तीरावर गाई चारीत असतांना बांसरी वाजवून गोपांना तूं मोहून टाकतोस.

---

११

# होळीच्या सणाच्या चिजा

### १ राग–वसंत. तिलवाडा

आंबुवा बोरे लारे सब नर नारी मिलके खेले धंवरी
॥ ध्रु० ॥
सोहे अजबवा पीकी छब निरखत प्यारे भर अबीर
गुलाल डारी ॥ १ ॥

**अर्थ**:– हे प्रिया, आम्रवृक्षाला मोहोर आहे व स्त्री पुरुष जमून होरी (धमार) खेळत आहेत. प्रियकराचें विलक्षण सौंदर्य शोभून दिसत आहे. तें पाहून त्याच्यावर अबीर गुलाल उधळत आहेत.

### २ राग–वसंत त्रिताल

पिया संग खेलोरी बरन बरनके वसन पहेर फुलवनके
हारुवा गूंध गूंध डारी हो गरुवा ॥ ध्रु० ॥
अैसोही वसंत उपजी सबके मन उलसा लीयो बलमा
अत ही चाव परीला मोरा जियरुवा ॥ १ ॥

**अर्थ**:– तऱ्हतऱ्हेचे कपडे करून व गळ्यांत फुलांचे गुंफलेले हार घालून आपल्या प्रियकरांबरोबर (स्त्रिया) खेळत आहेत. असा सर्वांना उल्हसित करणारा वसंत ऋतु प्राप्त झाला असल्यानें हे प्रियकरा, तुझ्याविषयीं माझ्या जिवाला अत्यंत तळमळ लागून राहिली आहे.

### ३ राग–वसंत. त्रिताल

फगवा व्रिज देखनको चलोरी फगवामें मिलेंगे कुंवर
कन्हैया बाट चलत बोले कगवा ॥ ध्रु० ॥
आई बहार सभी बन फूली रंगीले लालको ले
आगवा ॥ १ ॥

**अर्थ**:– चला ! व्रजांतील होळीचा समारंभ पाहूं. तेथें श्रीकृष्ण भेटेल. वाट चालतांना कावळा ओरडत आहे. सर्व वन फुललें असून



बहार आली आहे असें म्हणून सर्वांना घेऊन रसिक कृष्णाकडे (त्या समूहाचा) नायक गेला.

### ४ राग–हिंडोल. तिलवाडा

येरी में पी संग खेलों री बन बनके फाग ऋतु बसंत
रसबस हँस हँसत ॥ धृ. ॥
साँवरी गोरी भोरी भर गुलाल ले सोहे अजब ऋतु
वसंत रसबस हँस हँसत ॥ १ ॥

**अर्थ**:– हे सखि, वनावनांतील फाग (होळीचा सण) व वसंत ऋतु प्रेमानें हंसत आहेत. (अशा वेळी) मी पण माझ्या प्रियकरा बरोबर खेळत (होरी) आहे. सांवळ्या, गोऱ्या व भोळ्या स्त्रियांनी (गोपींनी) गुलाल भरून घेतला आहे व (हाताने गुलाल उडवित असतां) वसंत ऋतु कांहीं अजबच शोभतो आहे.

### ५ राग–हिंडोल. आडा–चौताल

खेलत बसंत राजाधिराज देखत नभ कौतुक सुरसमाज
॥ ध्रु० ॥
सोहे अनुज सखा रघुनाथ साथ जोरीन अबीर पिच–
कारी हाथ ॥ १ ॥

**अर्थ**:– राजाधिराज रघुनाथ (प्रभु रामचंद्र) वसंत ऋतुमध्यें हातांत पिचकारी घेऊन आपल्या बंधूसह जोडीने खेळतांना शोभत असून आकाशांत सर्व देव हें कौतुक पाहात आहेत.

---

११

# शास्त्रीय माहितीच्या चिजा

## १ राग–हिंडोल. तिलवाडा

तानन गाये बजाये गत भेद ताल परन बनाये गाये
नीकी समसो ॥ ध्रु० ॥
बितत वाद मिरदंग संग लिये गुनीजन संगतसो ॥ १ ॥

**अर्थ**:– गाणें गात असतांना तालाचें भिन्न भिन्न गत–परण बांधून उत्तम समेनें गावें, वाजवावें. मृदंग या वितत वाद्यानें गुणी–जनांची चांगली साथ करावी.

## २ राग–लच्छासाख. झपताल

प्रथम ताल सूर साधे सोई गुनीजन सुध मुद्र बानी ॥ ध्रु० ॥
ध्रेत्त मध विलंपत कर ले दिखावो सप्त सूर तीन ग्राम
बाईस श्रुति अत भेद सब पाये ॥ १ ॥

**अर्थ**:– प्रारंभी ताल, सूर साधावे व गुणीजनांनी शुद्ध मुद्रा व शुद्ध वाणी ठेवून विलंबित, मध्य व द्रुत करून दाखवून सात स्वर, तीन ग्राम व बावीस श्रुतींचे सर्व भेद समजून घ्यावे.

## ३ राग–तोडी. द्रुत एकताल

साच सुरन गाये बजाये रिझाये ये हो सब मिल
आपने गुरुको ॥ ध्रु० ॥
* सप्तसुरन
गुनी जनको संगतसो रागपूरन नीधपमगरेसा सारे–
गमगरेसा सारेगमपधपमगरेसा सारेगमपधनीसा सांनी–
धपमगरेसा धाकिटतक धुमकिटतक धित्ता धिडनग
तिरकिड नगिन तगिन तक धिता धा ॥ १ ॥

**अर्थ**:– आपण सर्वांनीं शुद्ध स्वर गाऊन व वाजवून आपल्या गुरुदेवांना प्रसन्न करावें. गुणीजनांची संगत करून सर्व राग, सात स्वर व वाद्यांचे बोल यांची माहिती प्राप्त करून घ्यावी; इत्यादि.



## ४ राग–भीमपलास. तिलवाडा

राग समुद्रको तो है महा कठन रस कौन
करे वाको बेस्तारन रस ॥ ध्रु० ॥
राग समुद्रको तिरनको सरसति आनकर
बिचार तबहूँ न पायो है बेस्तारन रस ॥ १ ॥

**अर्थ** :– राग समुद्राची गोडी समजणें (अंत लावणें) फार कठीण आहे. त्याचा विस्तार कोण करणार ! रागसमुद्र तरण्याचा सरस्वतीनें विचार केला. परंतु तिलाही अंत लागला नाहीं.

## ५ राग–मारवा. द्रुत एकताल

गायक सब मिल विचार लेहो या बातमों सुधे
अस्ताई सुधे अंछर राग तालकी संगतमो धरन
मुरनसो तब कैये बाको ॥ ध्रु० ॥
और उक्त जुक्त काबमें धरिये अनूप प्राससे
सब धुरपद गावे बजावे सुनावे ऐसे जो होवे
श्रेष्ठ सबन सुख ॥ १ ॥

**अर्थ** :– शुद्ध अस्ताई, शुद्ध अक्षरें, राग, ताल, धरन मूरन या सर्वांचा गायकांनी विचार करून उक्त जुक्त ताब्यांत आणून उत्तम प्रासयुक्त धृपद बनवून गावें वाजवावें, ऐकवावें म्हणजे त्यायोगें उत्तम प्रकारचें समाधान प्राप्त होईल.

## ६ राग–बहादुरी तोडी. वि. एकताल

पार न पाईये गुन समुद्र अथांग कौन विध
तिरिये कहा करिये कोन घटानिये ॥ ध्रु ॥
गुनी ग्यानी नेत्र ऐसो जो लावत ताल सूर
तान किये घटानिये ॥ १ ॥

**अर्थ** :– या अथांग गुण–समुद्राचा (राग–समुद्र) अंत कोणासही लागला नाहीं. यांतून कोण तरून जाणार ! ज्ञानाच्या नेत्रानें जे गुणी ताल, तान, स्वर (योग्य रीतीनें) लावतील तेच यांतून तरून जातील.

## ७ राग–सावनी–कल्याण. झपताल

गावो बजावो सुरस राग सुरस ताल सकल
कलाभिज्ञ ॥ ध्रु० ॥
आरोही अवरोही अस्ताई संचारी जो लिखे
जो सीखे कर दिखावो ॥ १ ॥

**अर्थ :–** हे सर्व कलानिपुणांनों, उत्तमोत्तम रागांचें व तालांचें गायन–वादन करा. आरोही, अवरोही, अस्ताई, संचारी जें लिहिलें असेल (शास्त्रज्ञांनीं), जें तुम्हीं (गुरुपासून) शिकला असाल तें करून दाखवा.

---

# चिजांची सूची

१२ राग– पूरिया

१ फूलनको हारवा गूंध लावो
२ पिया गुनवंत
३ मैं मिली आई आपने पियाको
४ पिया आये मोरे मनभाये

१३ राग– हमीर

१ चमेली फूली चंपा
२ ये लाल मनकी
३ धीट लंगरुवा कैसे

१४ राग– देवगंधार

१ लाडली बना बन आया

१५ राग– दरबारी कानडा

१ दुलहन तेरी आछी लगी
२ सुहागन चोलेरा

१६ राग– बिभास

१ मालन आई बगुवामें

१७ राग– शुद्ध कल्याण

१ सखि आज मौंदर बाजे

१८ राग– मिया मल्हार

१ अत धूंदर दौरे आये
२ बिजली चमके बरसे
३ बोलोरे पपियरा

१९ राग– भूप

१ जबही सब निरपत
२ चमक चली मालनी बिजलिया

२० राग– मालकंस

१ कबहूँ कपी
२ पीर न जानी रे
३ लंगर धीट तोहे

२१ राग– भैरव

१ धन जसोमत राज
२ हो गई भोर

२२ राग– (को. रिषभ) आसावरी

१ बढैया लावो लावो रे

२३ राग– गौडमल्हार

१ कोयलिया बोलन लागी
२ पपी दादुरवा बुलाई
३ बलुमा बहार आई
४ काहे हो हमसों पीतम
५ सुरंग चुनरिया

२४ राग – बहार

१ नई ऋत नई फूली
२ कलियन संग करत
३ कैसे निकसी चांदनी

२५ राग – भैरव बहार

१ नई डरियन पर कोयलिया
२ डालरिया झुके रहे

२६ राग – वसंत बहार

१ बरजो न मानेई रे



२७ राग – मेघ मल्हार

१ उमड घुमड घन आये
२ मा चमके बिजलिया

२८ राग – सूर मल्हार

१ गरजत आये बादर
२ घोर घोर घोर घोर बरसत
३ बादरवा बरसनको आये

२९ राग – जयंत मल्हार

१ ऋतु आई सावनकी

३० राग – आसावरी

१ भली बजाई रे
२ ये माधो नेक निहारो
३ कोन रिझावन जायेरी
४ भोर गई मिलन भइलवा
५ पिया मोरा गइलो बिदेसवा
६ कान्ह न कर मुसे

३१ राग – मालश्री

१ दीजो दरस मोहे

३२ राग – सोहनी

१ देखो रे पिया

३३ राग – काफी कानडा

१ गोरे गोरे मुखपर

३४ रा – केदार

१ जुगनुवा चमके रहो
२ बनठन कहा जू चली
३ सीके हो छलबल

३५ राग – गौड सारंग

१ कजरारे प्यारी तोरे नैन
२ पल न लागी मोरी आँखियाँ
३ जिन करो लरकैया

३६ राग – मालगुंजी

१ बनुमें चरावत गैया

३७ राग – बागेश्री

१ आवो मोरे लाला

३८ राग – बिलासखानी तोडी

१ नीकी घुंगरिया

३९ राग – यमन

१ हारुवा मोरा देहो मँगा
२ कै सखि कै सखि करिये
३ लंगर तोरे कधि न छिवोरी

४० राग – मुलतानी

१ लाडी थारी बातनू
२ अरे पाथकवा
३ हमसे तुम

४१ राग – शाम कल्याण

१ ऐसा तुमको मैं जानत हूँ

४२ राग – पूर्व्या कल्याण

१ डारूंगी हारुवा

४३ राग – सुधराई

१ बलमा रे चुनरिया

४४ राग – मारवा

१ पिया मोरे आनू देस

२ पिया बिन जियरा
३ गायक सब मिल

### ४५ राग – जेत कल्याण
१ आज क्यों नहीं आये

### ४६ राग – बसंत
१ भँवरा रे दूर दूर
२ आंबुवा बोरे लारे
३ फगवा ब्रिज देखनको चलोरी
४ पिया संग खेलोरी

### ४७ राग – जेताश्री
१ जबते पिहू सपने आये

### ४८ राग – भटियार
१ पिया बिन मोहे

### ४९ राग – अडाणा
१ गगरी मोरी भरन नही देत

### ५० राग – कामोद
१ अधर धरत मुरली

### ५१ राग – हिंडोल
१ मग मत रोको
२ येरी में पी संग खेलोरी
३ खेलत वसंत राजाधिराज
४ तानन गाये बजाये

### ५२ राग – मारु बिहाग
१ कैसे कर जावूं में

### ५३ राग – शुद्ध सारंग
१ मोरे चित चोरे लाला

### ५४ राग – लच्छासाख
१ प्रथम ताल सूर साधे

### ५५ राग – बहादुरी तोडी
१ पार न पाइये

### ५६ राग – सावनी कल्याण
१ गावो बजावो सुरस राग

---



# शब्द-कोष

अत – अति
अन – अन्न
अनोखी – वेगळीच, विचित्र
अटरिया – गच्ची
अठलाना – नखरा करणें
आन – येऊन
आसा – आशा
आनु – अन्य
आडोही – आडवून
इत – याबाजूला (माझ्याकडे)
उघरना – व्यक्त करणें
उरझना – आसक्त होणें
ऊनऊन – (उमड उमड) ढग भरून येणें
कधी – (कभी) कदापि
कल – चैन
कबलौं – केव्हां
कगुवा – कावळा
कंथ – (कंत) – प्रियकर
काहे – कशाकरितां
किस बिध – कशाप्रकारें
कीनो – केलें
केर (का) – चा (षष्ठी विभक्ति)
गर – विष
गजरवा – गजर (तास)
गरे – (गलेमें) गळ्यांत
गरुवा – घडा, आदरानें
गमाना – व्यर्थ घालविणें
गहानु – (घना) अत्यंत
गैल – रस्ता
घरी – घडी
चतुर भुजनकर – चतुर्भुजधारी
चटकेली – चमकदार
चंद – थोडे
चित – मनापासून
चितरा – चित्त
चेत – सावध हो
चोलेरा – लग्नाच्या वेळचें वरानें नेसण्याचें वस्त्र
छेइलवा – (छैल) रंगेल
जा – (जिस) – ज्या
जाम – (याम) – प्रहर
जियारा – प्राण, जीव
जिन – (मत) नको
जुगनुवा – एक प्रकारचा दागिना
जोबनमाती – तारुण्य युक्त
टेरत – (टेरना) – आळवीत
टेसू – पळस
ठाडो – उभा
डंबर – मोर पिसावरचा चंद्र

डारुँ – (डालूं) – घालूं
ढरकना – लवंडणें
तनिके – (तनिक) जरा–सुद्धां
तुमिसन – तुझ्याशीं
तेहारे – तुमची
तोहे – (तुझको) – तुला
दादुरवा – बेडूक
दिल लावो – (दिल लगावो) चित्त लाव
दिनो – (दिया) – दिलें
दुधपूत – धन आणि संतति
देख – पाहण्याची क्रिया
धन – धान्य
धंवर – (धमार) होरी-गीत
धुंधर – (धुंधले) काळे कुट्ट
धुंम – धुम धडाक्याने
निरमोही – (निर्मोही) निष्ठुर
निकसना – पडणें, निघणें
निरपत – (नृपति) राजे
नीका – सुंदर, चांगला
नेवर – पेंजण
नेहा – (नेह) प्रेम
नोने – नवीन
पनघटवा – पाणवठा
पथकवा – प्रवासी
पगिया – पगडी

पची – (पचना) यत्न करणें
पियरुवा – प्रियतम
पुरवैया – पूर्व दिशेकडील हवा
पैछो – (पीछे) नंतर
बना – नवरा
बगर – घर
बनरा – नवरा
बधावरा – मंगलोत्सव
बनुके कारन – नवऱ्याकरता
बढैया – सुतार
बजरुवा – बाजार
बगवा – बाग
बरनिा – बेहोष होऊन–ओरडणें
बनवारी – श्रीकृष्ण
बहुतेरो – पुष्कळ
बाँ – वेळ, उशीर
बारी – बगीचा
बातनमों – (बातोंमें) बाबतींत
बासा – (बासा) निवास-स्थान
बिरहाना – व्याकुळ होणें
बीरी – विडा
बेर – उशीर, वेळ
बेहार – नथ
बैंया – (बाहे) हात



बोलना – (बोलै) बोलणें
( भई – झाली )
[ भवसागरते – ( भवसागरसे ) भवसागरांतून ]
भँवरजाल – संसाररूपी जाळें
भनकना – सांगणें
भाना – (भावै) आवडणें
भूखन – भूषण (अलंकार)
भेक – (भेष) वेष
मनरंग – कवीचें नांव
मतवारो – उन्मत्त
मनुख – मनुष्य
मडैया – झोपडी
मख्तूल – काळचा रेश–माचा दोरा
मगवा – रस्ता
मंदिलरा – ( मंदर ) एक वाद्य
माती – प्रसन्न
मेहरुवा – मेघ
मैको – (मुझको) मला
मोपे – (मुझपर) माझ्यावर
मोसे – (मुझसे) मला
मोतन – मोती
या – (इस) ह्या
येरी – (स्त्री)– गडे (संबोधन)
रंगभीनी – मोहक
रंगवारे – आनंदित करणारा

रस – प्रेम
रतिया – रात्र
रहसना – प्रसन्न होणें
रार – दंगा मस्ती
राती – रंगून गेलेली
रैन – रात्र
लछमी – लक्ष्मी
लब – ओंठ
लकुट – (लकडी) काठी
लटकन – चौकडा
लरजना – घाबरें होणें
लरकैया – पोरकटपणा, दंगामस्ती
लंगरुवा – खोडकर
लाडी – सखी
लाल – प्रियकर
लुगवा – लोक
लोभीचेता – लोभी
वाको – (उसका) त्याचे
विखको – (विषका)– विषाचा
वारना – ओंवाळून टाकणें
वाद(वाद्य)– वाद्य
समाये(समय)–काळ
सरस – सहृदय
समधन – विहीण
समधि – व्याही
( सरैं नहीं – साधत नाहीं )
सदारंग – कवीचें नांव

साईयाँ – परमेश्वर
सांची – (बात)खरी गोष्ट
साहबको (साहबका)–परमेश्वराचें
साच – सत्य, खरें
सिरी – थंड, शांत
सुघर – चतुर, सुंदर
सेवडा – जैन भिक्षु, साधु
सुध – आठवण
सेहरा – मुंडावळ
सोतन – सवती
हररंग – कवीचें नांव
हारी – (हरना) हरणें
हुजूर – सान्निध्य
हेरना – टेहळणी करणें

# शुद्धिपत्रक

| | पृष्ठ | बोळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| (निवेदन) | १ | ५ | बोल ताना | बोलताना |
| ( " ) | २ | १७ | व चकाकडून | वाचकांकडून |
| | ४ | २१ | हिदी | हिंदी |
| | " | २५ | अब तो बेर | अब तो बडी बेर |
| | ५ | ७ | हें साधन | साधन |
| | " | १९ | छायानाट | छायानट |
| | " | २२ | दयाधन | दयाघन |
| | ८ | १७ | बहुत | बहतु |
| | ९ | ३ | व्याहन | ब्याहन |
| | " | १० | व्याहन | ब्याहन |
| | " | १७ | गंध | गूंध |
| | १३ | ३ | भेरव | भैंरव |
| | २५ | १३ | मोप | मोपे |
| | २७ | २० | प्रेमा मलाने | प्रेमानें मला |
| | २८ | २२ | रिलो | करिलो |
| | " | २६ | माझ | माझें |
| | २९ | १५ | अलिगन | आलिगन |
| | ३० | २२ | गया | गयी |
| | ३१ | १७ | व हातांत | हातांत |
| | ३२ | २५ | जाणीत | जाणत |
| | ४० | २१ | शुद्ध सारग | शुद्ध सारंग |
| | ४२ | ७ | मोहोर आहे | मोहोर आला आहे |
| | ४४ | ६ | गात–परण | गतपरण |
| | " | १९ | रागपूरन | रागपूरन सप्तसूरन |
| | ४५ | १४ | सब | तब |